जगद्गुरु श्रीमद्

आद्य शंकराचार्य-प्रणीत

# आत्मानात्मविवेक

(केवलाद्वैत वेदान्ताचा प्राथमिक परिचय करुन देणारा ग्रंथ)



संपादक

डॉ. के. वा. आपटे

**प्रा. डॉ. के. वा. आपटे यांचे प्रकाशित आणि अप्रकाशित ग्रंथ : –**

**१) संस्कृत** : –

१) श्रीगुरुलिंगगीतम्     २) श्रीदासरामगीतम्

३) श्रीदासराममहाराज–सहस्रनामस्तोत्रम्     ४) श्रीदासराम–रक्षा–स्तोत्रम्

**२) हिंदी** :– १) हेमचंद्रकृत प्राकृत व्याकरण २) त्रिविक्रमकृत प्राकृतशब्दानुशासन

**३) इंग्रजी** : –

१) मेहकुमारकहा (नायाधम्मकहाओ)

**४) मराठी**

**१) व्याकरण ग्रंथ :–** १) हेमचंद्रकृत अपभ्रंश व्याकरण

२) वररुचिकृत प्राकृत व्याकरण

**२) चरित्र ग्रंथ** :– चिमड संप्रदायातील निंबरगीकरमहाराज, दासराममहाराज, इत्यादी नऊ संतांची चरित्रे

**३) संपादित :**– वचन संग्रह, परमार्थ प्रश्नोत्तरी, श्लोकरचना, प्रवचने, सद्‌बोधदशक , ज्ञान आणि बोध, इत्यादी दासराममहाराजांचे ग्रंथ

**४) जैनदर्शन :**–

१) न्यायावतार     २) नयकर्णिका     ३) जैन तत्त्वज्ञान

**५) भगवद्‌गीता** : –

१) गीतेतील तीन पदे  २) पाठांतरसुलभ भगवद्‌गीता

३) श्रीमद् भगवद्‌गीता (प्रस्तावना, भाषांतर व टीपा )

४) भगवद्‌गीता (लेखसंग्रह)

५) भगवद्‌गीता (निवडक श्लोकांवरील लेख)

**६) भाषांतरित** : –

१) कालिदासकृत विक्रमोर्वशीय नाटक

२) भगवद्‌गीता तत्त्वविवेचिनी टीका

३) प्रेमदर्शन (नारद भक्तिसूत्र)

४) अध्यात्म रामायण (२ ते ४ हे ग्रंथ डॉ. गो. रा. कुलकर्णी यांचे सह)

**७) शंकराचार्य** : –

१) ब्रह्मसूत्र–शांकरभाष्य चतु:सूत्री     २) आत्मानात्मविवेक

३) तत्त्वोपदेश     ४) शतश्लोकी     ५) विवेकचूडामणि

**८) अन्य ग्रंथ** : –

१)दासबोधातील तत्त्वज्ञान     २) चिमड संप्रदाय

३)श्रीगुरुतृतीया कथा

जगद्गुरु श्रीमद्
आद्य शंकराचार्य-प्रणीत

# आत्मानात्मविवेक

(केवलाद्वैत वेदान्ताचा प्राथमिक परिचय करून देणारा ग्रंथ)

* संपादक *
प्रा. डॉ. के. वा. आपटे

* प्रकाशक *
नारायण केशव आपटे
सांगली

## प्रस्तावना

**शंकराचार्य : संक्षिप्त जीवनचरित्र :-** अगाध बुद्धिमत्ता, कडकडीत वैराग्य, अथांग ज्ञान, वादकुशलता, हृदयंगम लेखन शैली, अनेक ग्रंथांचे लेखन, इत्यादि गुणांनी संपन्न असणारे आद्य श्री शंकराचार्य हे प्राचीन भारतातील एक अलौकिक आणि अद्वितीय विभूति होते, यात संदेह नाही. किंबहुना ते भगवान् शंकराचा अवतारच होते, असे मानले जाते. त्यांना श्रीमत् जगद्गुरु ही पदवी शोभून दिसते. आपल्या अल्प आयुष्यात त्यांनी जे प्रचंड कार्य केले होते त्याला तोड नाही. आसेतुहिमाचल भारत-भ्रमण करून, त्यांनी जनजागृति केली. स्वत: संन्यासी असून, त्यांनी निष्काम कर्मयोगाचे आचरण केले. त्यांच्या उपलब्ध ग्रंथांवरून बोलावयाचे झाल्यास, ते वेदशास्त्रज्ञ, एकनिष्ठ भक्त, योगी, तत्त्वज्ञानी महापुरुष, आणि आत्मसाक्षात्कारी संत होते हे कळून येते.

आद्य शंकराचार्यांनी अफाट लेखन केले पण स्वत:विषयी काही लिहून ठेवलेले नाही. त्यांच्याविषयी इतर ग्रंथकारांनी जे लिहून ठेवले आहे, त्यावरून त्यांच्या जीवनाविषयी कळते ते असे :-

भारताच्या दक्षिण टोकाला असणाऱ्या केरळराज्यात, पूर्णा[१] नदीच्या काठावर कालटी नावाचे एक गाव आहे. या गावी नंबुद्री ब्राह्मण जातीचे एक कुटुंब रहात होते. त्यात विद्याधिराज या नावाचा एक सदाचारसंपन्न विद्वान् ब्राह्मण गृहस्थ होता. तो कृष्ण यजुर्वेदी होता. अध्ययन व अध्यापन करणे हा त्याचा व्यवसाय होता. भगवान् शंकराच्या कृपेने त्याला एक मुलगा झाला. त्याचे नाव शिवगुरु. शिवगुरु हाही वेदशास्त्रसंपन्न होता आणि तोही अध्ययन अध्यापन करीत असे. त्याच्या पत्नीचे नाव [२]आर्याम्बा. या दांपत्याला दीर्घ काळ अपत्य नव्हते. पति-पत्नींनी भगवान् शंकराची आराधना केली. शंकराच्या आशीर्वादाने या जोडप्याला एक [३]पुत्ररत्न झाले. त्याचे नाव शंकर असे ठेवण्यात आले. हा बाल शंकरच पुढे जगद्गुरु शंकराचार्य या नावाने ख्यातनाम झाला.

शंकराचार्यांच्या बालपणीच शिवगुरूंचे कैलासगमन झाले. शोकाला आवर घालून आर्याम्बेने बाल शंकराचे पालन-पोषण केले. पाचव्या वर्षी शंकराचे उपनयन करण्यात आले, व त्याची गुरुगृही अध्ययनासाठी पाठवणी करण्यात आली. वयाच्या आठव्या वर्षीच शंकराचार्यांचे वेदांचे आणि शास्त्रांचे अध्ययन पूर्ण झाले व ते स्वगृही परत आले.

बालपणापासूनच शंकराचार्यांच्या अंत:करणात धगधगीत वैराग्य होते आणि एक विशिष्ट ध्येय दृष्टीपुढे होते. त्यामुळे लगेच संन्यास घ्यावा असे शंकराचार्यांना वाटत होते. पण त्यासाठी शंकराचार्यांना मातेची संमति मिळत नव्हती. आणि आईच्या अनुज्ञेशिवाय संन्यास तर घेता येत नव्हता. अशा स्थितीत एका विशिष्ट घटनेमुळे आईने शंकराचार्यांना संन्यास घेण्याची परवानगी दिली. ही घटना अशी :-

---

१. या नदीला आलवाई असेही म्हणतात.

२. सती किंवा विशिष्टा असेही नाव दिले जाते

३. शंकराचार्यांचे जन्मस्थळ व काळ याबाबत मतभेद आहेत

एके दिनी आईबरोबर शंकराचार्य नदीवर स्नानासाठी गेले होते. आई नदीच्या काठावर होती तर शंकराचार्य पाण्यात होते. इतक्यात एका सुसरीने शंकराचा पाय पकडला. शंकराच्या मित्रांनी काठावर येऊन ही बातमी आईला सांगितली. आई शोक करू लागली. तितक्यात शंकराचार्य मोठ्याने म्हणाले. "आई, तू जर मला संन्यास घेण्यास अनुमति देशील, तर ही सुसर माझे पाय सोडील." संन्यास घेऊन का होईना आपला लाडका मुलगा जिवंत रहावा या इच्छेने आईने शंकराला संन्यास घेण्यास परवानगी दिली. इकडे सुसरीने शंकराचा पाय सोडला. शंकराचार्य तीरावर आले. घरी गेल्यावर, "आई, तू स्मरण करशील त्यावेळी मी तुला येऊन भेटेन." असे आईला अभिवचन देऊन, संन्यास घेण्यासाठी शंकराचार्य गुरूच्या शोधार्थ घराबाहेर पडले.

गुरूचा शोध करीत शंकराचार्य उत्तर दिशेने प्रवास करीत होते. मार्गावर त्यांना कळले की गोविंदयति नावाचे एक महान् अधिकारी पुरुष नर्मदा नदीच्या तीरावर रहातात. त्यांचे दर्शन घेण्यास शंकराचार्य नर्मदेजवळ आले. त्यांनी गोविंदयतींचे दर्शन घेतले. त्यांचेकडून शंकराचार्यांनी विधिवत् संन्यासदीक्षा घेतली आणि त्यांचे मुखातून केवलाद्वैत वेदान्ताचे श्रवण केले. गोविंदयतींचे[१] देखरेखीखाली शंकराचार्यांचे अध्ययन पूर्ण झाले. मग गोविंदयतींनी शंकराचार्यांना आज्ञा केली, " बाळा शंकरा, भारतभर संचार कर, सद्ग्रंथ लिही, आणि आपल्या केवलाद्वैत मताचा प्रचार व प्रसार कर."

गुरूंचा आशीर्वाद घेऊन शंकराचार्य काशीत आले. तेथे त्यांनी अध्यापन व ग्रंथलेखन सुरू केले. त्यांना अनेक शिष्य लाभले. असे सांगतात की एकदा व्यास महर्षि त्यांचेपुढे प्रगट झाले व त्यांनी शंकराचार्यांना ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहिण्याची आज्ञा केली. ती प्रमाण मानून शंकराचार्य हिमालयाच्या परिसरात गेले. तेथे त्यांनी ब्रह्मसूत्रांवरील आपले शारीरक नावाचे भाष्य पूर्ण केले. नंतर ते पुनः काशीत परतले. मग त्यांनी दिग्विजयास प्रारंभ केला. अनेक प्रतिपक्षी पंडितांचा वादविवादात पराभव केला. अशाप्रकारे भारतभर प्रवास करून त्यांनी आपल्या केवलाद्वैत मताचा प्रचार व प्रसार केला. त्यासाठी उपयोगी पडावे म्हणून भारताच्या चार दिशांत त्यांनी चार मठ स्थापन केले ते असे :- दक्षिण भारतात शृंगेरीमठ, द्वारकेत शारदामठ, हिमालयातील बदरिकाश्रमात ज्योतिर्मठ आणि जगन्नाथपुरीमध्ये गोवर्धनमठ.

यानंतर आपले जीवित-कार्य पुरे झाले असे वाटू लागल्याबरोबर, शंकराचार्यांनी देहविसर्जन करण्याचे ठरविले. आणि हिमालयात[२] जाऊन त्यांनी स्वेच्छेने महनिर्वाण केले आणि ते ब्रह्मरूप होऊन गेले.

**केवलाद्वैत तत्त्वज्ञान : संक्षिप्त मांडणी :-** उपनिषदांतील परस्परविरोधी वचनांचा समन्वय साधण्याच्या प्रयत्नातून शंकराचार्यांचे केवलाद्वैत तत्त्वज्ञान साकार झाले. " ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर:" (ब्रह्म सत्य आहे. जग मिथ्या आहे. जीव हा कोणी अन्य नसून तो ब्रह्मच आहे.), इतक्या थोड्या शब्दांत केवलाद्वैत तत्त्वज्ञान साररूपाने सांगता येते.

---

१. गोविंदयतींचे गुरु गौडपादाचार्य नावाचे होते. या गौडपादाचार्यांचाही उल्लेख शंकराचार्यांनी आदरपूर्वक केला आहे.

२. दक्षिण भारतात तुंगभद्रेच्या तीरी त्यांनी निर्वाण केले, असे एक मत आहे.

या तत्त्वज्ञानाकडे पारमार्थिक आणि व्यावहारिक अशा दोन दृष्टिकोनांतून पहावे लागते. पारमार्थिक दृष्ट्या निर्गुण ब्रह्म हे एकमेव अंतिम सत्य तत्त्व आहे. त्याच्या जोडीने अन्य कोणतेही परम / श्रेष्ठ तत्त्व नसल्याने, ते अद्वितीय / अद्वय / अद्वैत आहे. या ब्रह्मालाच आत्मा, परमात्मा, किंवा परात्मा असे म्हटले जाते. ब्रह्माखेरीज जे काही अन्य दिसते / भासते, ते सत्य नसल्याने मिथ्या आहे. आपल्या आवती-भोवती जे पसरलेले दृश्य जग आपणांस भासते, ते ब्रह्मरूप दिसत नसल्याने, ते ब्रह्मापेक्षा वेगळे वाटत असल्याने, ते मिथ्या आहे. जग हे ब्रह्माप्रमाणे सत्य नसून मिथ्या आहे. जग हे ब्रह्मावर अध्यारोपित किंवा अध्यस्त[१] आहे. म्हणजे ब्रह्म या अधिष्ठानावर जग मिथ्यारूपाने भासते. जसे : अंधारात जमिनीवर पडलेल्या रज्जूवर सर्प भासतो. अशाप्रकारे नानात्मक / द्वैतात्मक जग हे भासमान आहे. आता, या भासमान जगात ज्याला आपण जीव म्हणून संबोधतो, तो खरे तर ब्रह्मच आहे. जीव म्हणून ब्रह्मापेक्षा वेगळे असे काही स्वतंत्र तत्त्व नाही. जीव व ब्रह्म हे एकरूपच आहेत; त्यांच्यांत अभेद आहे.

पारमार्थिक सत्य जरी वरीलप्रमाणे असले, तरी ज्या जगात आपण वावरत आहोत ते तर आपणांस सत्यच वाटत असते. त्याचा उलगडा करण्यास व्यावहारिक दृष्टीचा अवलंब करून असे सांगितले जाते :- निर्गुण ब्रह्माला माया /अविद्या (=अज्ञान) ही उपाधि येते. माया या उपाधिअंती सगुण ब्रह्म किंवा ईश्वर ही संकल्पना येते. या ईश्वराची माया[२] शक्ति आहे. या शक्तीच्या द्वारा ईश्वरापासून जगाची उत्पत्ति, स्थिति व लय[३] होतात. पुढे या जगात उत्पन्न होणाऱ्या देह, इंद्रिये इत्यादींच्या उपाधीमुळे परमात्म्यालाच / ब्रह्मालाच[४] जीव मानले जाते. पण हे सर्व व्यवहारदृष्ट्या खरे आहे. अज्ञानी माणसाच्या दृष्टीने व्यावहारिक जगत् सत्य आहे.

परंतु ज्याला तत्त्व जाणून घ्यावयाचे आहे असा पुरुष जर ब्रह्मसाक्षात्कारी गुरूकडे गेला व त्यांचेकडून त्याने सत्य ज्ञान प्राप्त करून घेतले, तर त्याला इष्ट गोष्ट प्राप्त होते, खरे तत्त्व कळते. मग श्रवण, मनन व निदिध्यासन यांच्या द्वारा त्याला आपण जीव आणि ब्रह्म एकच आहोत, असा साक्षात्कार होतो (ब्रह्मात्मैक्यज्ञान). त्यामुळे अविद्येचा (=अज्ञानाचा) नाश होऊन जीव हा ब्रह्मरूपच[५] होऊन जातो. जीवाने ब्रह्मरूप होऊन जाणे म्हणजेच[६] मोक्ष आहे.

शंकराचार्यांचे ग्रंथ :- शंकराचार्यांच्या नावावर आज अनेकानेक लहानमोठे ग्रंथ दिले जातात. या ग्रंथांमध्ये दहा उपनिषदांवरील भाष्ये, ब्रह्मसूत्रावरील भाष्य, भगवद्गीतेवरील भाष्य, अनेक देवदेवतांची स्तोत्रे आणि अनेक प्रकरणग्रंथ आहेत. प्रकरणग्रंथामध्ये आत्मानात्मविवेक हा एक आहे. या ग्रंथाला

---

१. अधिष्ठानं परं ब्रह्म सच्चिदानंदलक्षणम् । तत्राध्यस्तमिदं भाति नामरूपात्मकं जगत् ॥
(शंकराचार्यकृत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, ८७९-८८०).

२. ईश्वरस्य मायाशक्तिः । ब्रह्मसूत्रावरील शांकरभाष्य, २.१.१४.

३. ईश्वराद् जगज्जनि-स्थिति-प्रलयाः । तत्रैव, २.१.१४

४. पर एव आत्मा देहेंद्रिय-मनो बुद्धि-उपाधिभिः परिच्छिद्यमानो बालैः शारीर इति उपचर्यते । तत्रैव, १.२.६

५. मिथ्याज्ञानापायश्च ब्रह्मात्मैकत्व - विज्ञानाद् भवति । ब्रह्मसूत्रांवरील शांकरभाष्य, १.१.४

६. ब्रह्मभावश्च मोक्षः । तत्रैव १.१.४

आत्मानात्मविचार असेही नाव आहे. आत्मानात्मविवेक आणि आत्मानात्मविचार हे दोन्हीही शब्द या ग्रंथाच्या संहितेमध्ये आढळून येतात. या दोन शीर्षकांपैकी आत्मानात्मविवेक हे शीर्षक अधिक बरे वाटल्याने तेच येथे वापरले आहे.

आत्मानात्मविवेक : शीर्षकाचा अर्थ : - आत्मानात्मविवेक म्हणजे आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक. म्हणजे आत्मा आणि अनात्मा या दोहोंतील फरकाचे / भेदाचे ज्ञान. आत्मा हा नित्य, सच्चिदानंद इत्यादि आहे; तर त्याच्यावर भासमान होणारे सर्व काही अनात्मा (=आत्मा नसणारे) असून, ते अनित्य, मिथ्या, दु:खरूप आहे. अशाप्रकारे या दोहोंतील भेदाचे ज्ञान म्हणजे आत्मानात्मविवेक होय.

आत्मानात्मविवेक या ग्रंथाचे प्रयोजन :-मानवी जीवनात अपरिहार्यपणे सुखदु:खांचे रहाटगाडगे चालू असते. तथापि दु:ख न मिळता सुखच मिळावे असे प्रत्येकाला वाटतच असते. म्हणून दु:ख दूर करण्याचे उपाय मानव वापरीत असतोच. परंतु त्या उपायांनी दु:ख हे नेहमीच दूर होते असे नाही. आणि काही दु:खे दूर झाली तरी दुसरी दु:खे दत्त म्हणून पुढे उभी ठाकतात. दु:ख-निरसनाचा जो उपाय शंकराचार्यांच्या केवलाद्वैत संप्रदायाला सापडला तो असा :- जीव हा मूलत: सुखरूपच आहे. पण आपण तसे आहोत याचा विसर पडल्याने तो दु:खी होतो. समजा:- आपल्या घरात पैशाचे डबोले आहे. पण त्याचा थांगपत्ता ज्ञात नसल्याने, पैशाच्या अभावी दु:ख होते. पण त्या डबोल्याच्या स्थानाचे ज्ञान होऊन, ते डबोले ताब्यात आले, की दु:ख संपून आनंद होतो. याचप्रमाणे माणसाला स्वत:च्या सुख - स्वरूपाचे ज्ञान नसल्याने, तो दु:ख भोगत रहातो. परंतु जर त्याला स्वत:च्या सत्य स्वरूपाचे ज्ञान झाले तर त्याला दु:खी होण्याचे कारण उरणार नाही. हे सांगण्यासाठीच शंकराचार्यांनी आत्मानात्मविवेक या ग्रंथाची रचना केली आहे.

दु:खनिरासाचा हा भाग थोड्या तात्त्विक भाषेत असा सांगता येतो :-या जगात जन्माला आल्यामुळेच माणसाच्या मागे दु:ख लागले आहे. जन्मानंतर मरण व मरणानंतर पुन: जन्म असे हे जन्ममरणाचे चक्र पापपुण्यात्मक कर्मांमुळे चालू राहते. तेव्हा दु:खातून सुटका म्हणजे जन्ममरणातून सुटका. आणि जन्ममरणातून सुटका म्हणजेच मोक्ष. हा मोक्ष म्हणजे माणसाला स्वस्वरूपाची प्राप्ति होय. जीवाचे स्वस्वरूप काय आहे? जीव हा ब्रह्मस्वरूप / आत्मस्वरूप आहे. आत्मा / ब्रह्म सच्चिदानंद आहे. म्हणून आत्मप्राप्ति झाली की नित्य आनंदाची प्राप्ति झालीच . आणि हे होण्यास आत्मानात्मविवेक हवा.

येथे असा एक प्रश्न उपस्थित होतो :- जर जीवाचे मूळ सत्य स्वरूप आत्मा / ब्रह्म आहे, तर दैनंदिन जीवनात माणसाला ते का कळत नाही ? या प्रश्नाचे उत्तर असे :- नेहमीच्या जीवनात आपल्याला आजूबाजूच्या जगाचे ज्ञान हे पाच ज्ञानेंद्रियांच्या द्वारे होत असते. आत्मा हा इंद्रियजन्य ज्ञानाच्या टप्प्यात येत नाही. तो अनुमानानेही कळत नाही. त्यामुळे आपण नेहमीच्या दैनंदिन व्यवहारात गुंतून राहतो. व आत्मस्वरूपाविषयी अज्ञानी रहातो. हे आपले आत्मविषयक अज्ञान दूर झाले तर आत्मज्ञान होईल. आत्म्याखेरीज आपणास जे जे दिसते / भासते, ते ते आत्मा नाही; म्हणून त्याला अनात्मा म्हणतात. या

अनात्म्यापेक्षा आत्मा वेगळा आहे हे ज्ञान व्हावयास हवे. ते ज्ञान होण्यास आत्मा व अनात्मा यांतील भेदाचे ज्ञान व्हावयास हवे. ते ज्ञान देणे हा आत्मानात्मविवेक या ग्रंथाचा उद्देश आहे. आत्मानात्मविवेकाने आत्मज्ञान होऊन, पुढे श्रवण-मनन-निदिध्यासन यांचे द्वारा आत्मसाक्षात्कार झाला की दुःखाचा लवलेशही त्रास देत नाही, हे सांगण्यास आत्मानात्मविवेक हा ग्रंथ प्रवृत्त झाला आहे.

आत्मानात्मविवेक या ग्रंथाचे स्वरूप :- आत्मानात्मविवेक या ग्रंथाचे काही स्वरूप प्रश्नोत्तरात्मक आहे, तर काही शंका-समाधानात्मक आहे. जरी गुरु व शिष्य हे शब्द या ग्रंथात स्पष्टपणे वापरलेले नसले तरी मुमुक्षु शिष्य प्रश्न करतो व गुरु त्याची उत्तरे देतात, अशी अध्याहृत भूमिका या ग्रंथात दिसते. कधी जिज्ञासु शिष्याला येऊ शकणाऱ्या शंकांचे समाधानही गुरूंनी केले आहे. येथील उत्तराच्या / समाधानाच्या संदर्भात पुढील गोष्टी लक्षणीय आहेत :- (१) केलेल्या विधानांच्या समर्थनार्थ , आवश्यक वाटेल तेथे वेदांतील / उपनिषदांतील वचने उद्धृत केलेली आहेत. (२) कधी आधारासाठी व्यवहारातील आपल्या अनुभवांचा निर्देश केला आहे. (३) आवश्यक तेथे विधानाच्या समर्थनासाठी तर्क/ युक्तिवाद दिलेला आहे. (४) कधी आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ केवलाद्वैत संप्रदायात प्रचलित असणारी पारंपरिक पद्ये उद्धृत केली आहेत.

या ग्रंथाचे मुख्य वैशिष्ट्य असे आहे :- केवलाद्वैत वेदान्त प्रथमच जाणून घेऊ इच्छिणाऱ्या जिज्ञासूसाठी हा ग्रंथ शंकराचार्यांनी लिहिलेला आहे. याच्या वाचनाने / अध्ययनाने जिज्ञासूला केवलाद्वैत विचारांची प्राथमिक ओळख होऊ शकते.

आत्मानात्मविवेक : खंडात्मक विभागणी :- आत्मानात्मविवेक या ग्रंथाच्या पूर्वीच्या मुद्रित प्रतीत लहानमोठे विभाग केलेले आहेत. ते एकूण ४१ आहेत. परंतु हे विभाग बरोबर वाटत नाहीत. कारण तेथे एका विभागातील एकच विषय पुढील विभागात गेलेला दिसतो. उदा. मुद्रित प्रतींमध्ये १३ व्या विभागातील अपूर्वता या लिंगाचे उदाहरण पुढील १४ व्या विभागात दिलेले आहे. म्हणून पूर्वीची विभागणी येथे टाळली आहे, आणि चर्चेच्या विषयांना धरून एकूण ७८ खंड केलेले आहेत, व त्यांना तसे क्रमांक दिले आहेत. या खंडविभागणीमुळे दोन फायदे झाले आहेत. :- (१) प्रतिपाद्य विषयाला धरून खंड असल्याने, एकाच खंडात तो तो विषय येतो. (२) मागचे पुढचे संदर्भ देताना ही खंड-विभागणी उपयुक्त ठरली आहे.

प्रस्तुत ग्रंथात प्रथम संस्कृत संहिता, नंतर तिचे भाषांतर, आणि त्यानंतर स्पष्टीकरण अशी पद्धत अवलंबिलेली आहे. संस्कृत संहितेत काही ठिकाणी संधि सोडवून दिलेले आहेत. अधिक जिज्ञासु वाचकांना उपयोगी पडतील अशी संस्कृत वचने आवश्यक तेथे तळटीपांत दिलेली आहेत.

ऋणनिर्देश :- भारताच्या मध्यवर्ती शासनाकडून इ.स. १९८९-९१ या दोन वर्षांसाठी "शास्त्रचूडामणि" या योजनेखाली मला सेवानिवृत्तीनंतर शिष्यवृत्ति मिळाली होती. त्या योजनेखाली शंकराचार्यांच्या आत्मानात्मविवेक या ग्रंथाचे स्पष्टीकरणासह इंग्रजी रूपांतर साकार झाले होते. ते शासनातर्फे प्रकाशित होईल काय ही विचारणा करणाऱ्या माझ्या पत्राला शासनाकडून काहीच उत्तर आले नाही. तेव्हा

मी ते इंग्रजी रूपांतर बेळगावच्या पाथवे टू गॉड (*Pathway to God*) नावाच्या त्रैमासिकाकडे प्रसिद्धीसाठी पाठविले; तेथे ते इ.स. १९९६-१९९९ या काळात क्रमशः प्रसिद्ध झाले. पुढे त्याचेच मराठी रूपांतर करून मी ते नागपूरच्या जीवनविकास नावाच्या मासिकाकडे पाठविले. तेथे ते जानेवारी ते सप्टेंबर १९९९ च्या अंकात क्रमशः प्रसिद्ध झाले. जीवनविकासचे संपादकांनी आपल्या दि. १०-५-२००० च्या पत्राने, हे लेख ग्रंथरूपाने प्रकाशित करण्यास परवानगी दिली याबद्दल त्यांचे मन:पूर्वक आभार. या जीवनविकास मासिकात प्रसिद्ध झालेल्या लेखांकांत आवश्यक तेथे अधिक मजकूर घालून, प्रस्तुतचे ग्रंथरूप सिद्ध झाले आहे.

जीवनविकासमध्ये येणारे लेखांक माझी पत्नी सौ. माया ही काळजीपूर्वक वाचत होती. तिला ते फार आवडले. ते ग्रंथरूपाने प्रसिद्ध व्हावेत अशी इच्छा तिने अनेकदा व्यक्त केली व ग्रंथात अधिक काय यावे हेही तिने सुचविले. तिच्या इच्छेला मूर्त स्वरूप देण्याचे काम माझे चिरंजीव श्री. नारायण यांनी आदरपूर्वक केले आहे. या दोघांचाही मी कृतज्ञ आहे.

भ.स. श्रीदासराममहाराज, सांगली यांनी माझ्या लेखनाला पहिली प्रेरणा दिली व आपले आशीर्वाद दिले. त्यांचे आशीर्वाद असेच राहोत. माझ्या लेखनाविषयी आपुलकी बाळगणाऱ्या कै.प्रा. डॉ. गुरुवर्य माईणकर यांचीही स्मृति मला येत आहे.

प्रस्तुत ग्रंथ साकार होताना ज्या पूर्वसूरींच्या ग्रंथांचा मला उपयोग झाला, त्या सर्वांचा मी ऋणी आहे.

एस.बी.लिथो प्रेस सांगली याचे चालक व कामगार यांनी मुद्रणाचे काम व्यवस्थित केले. मी त्यांचा आभारी आहे.

प्रस्तुत ग्रंथात कळत न कळत काही कमी-जास्त झाले असण्याची शक्यता आहे. तेव्हा "न्यून ते पुरते । अधिक ते सरते " करून घ्यावे, अशी जाणत्या सज्जनांना विनंति आहे. इति शम्.

सांगली.
१-१-२००१

के. वा. आपटे

# विषयानुक्रम

(प्रथम विषय दिलेला आहे. नंतर तो विषय ज्या खंडात आला आहे, त्या खंडाचा क्रमांक कंसात ठेवला आहे)

# आत्मानात्मविवेक – पुनर्मुद्रण

## प्रकाशकाचे निवेदन

माझे तीर्थरूप प्रा. डॉ. के. वा. आपटे यांनी प्रस्तावना, अर्थ व टीपा यांसह संपादित केलेला आद्य शंकराचार्यांचा आत्मानात्मविवेक हा प्रथम इ.स. २००१ मध्ये मी प्रकाशित केला होता. शंकराचार्यांच्या केवलाद्वैत वेदान्ताचा प्राथमिक परिचय करून देणारा हा ग्रंथ आहे. प्रकाशनानंतर १–२ वर्षांतच या ग्रंथाच्या सर्व प्रती समाप्त झाल्या. तरी या ग्रंथाला काही उत्सुक वाचकांकडून मागणी येत होती. तथापि काही अपरिहार्य कारणांनी या पुस्तकाचे पुनर्मुद्रण करणे शक्य झाले नाही. आता काहींनी या पुस्तकाबद्दल पुन: चौकशी केल्याने, या ग्रंथाचे पुनर्मुद्रण करण्याचे मी ठरविले व त्यानुसार हे पुनर्मुद्रण आता प्रकाशित होत आहे. त्याला पूर्वीप्रमाणेच वाचकांकडून प्रतिसाद मिळेल अशी आशा आहे.

या पुनर्मुद्रणाचे काम एस. बी. ऑफसेटचे संचालक श्री. अमोल कुलकर्णी व त्यांचे मुद्रणालयातील सेवक यांनी त्वरित सुबकपणे करून दिले याबद्दल मी त्या सर्वांचा मन:पूर्वक आभारी आहे.

हे पुनर्मुद्रण पाहून माझे सद्गुरू श्रीदासराममहाराज केळकर यांना संतोष होईल अशी खात्री आहे.

ना. के. आपटे.

# आत्मानात्मविवेक:

## (१)

**दृश्यं सर्वमनात्मा स्याद् दृगेवात्मा विवेकिन: ।**
**आत्मानात्मविवेकोऽयं कथितो ग्रन्थकोटिभि: ॥१॥**

**विवेकी माणसाच्या बाबतीत, (विश्वातील) सर्व दृश्य (पदार्थ हे) अनात्मा आहे; (दृश्य पदार्थांचा) द्रष्टा असणारा असा आत्माच आहे. आत्मा आणि अनात्मा यांचा हा विवेक कोट्यवधी ग्रंथांनी सांगितला आहे (१).**

या जगात माणूस रहातो. त्याला जगातील नानाविध वस्तु दिसत असतात. बाह्य वस्तूंचे ज्ञान त्याला डोळा, कान, नाक, त्वचा व जीभ या पाच ज्ञानेंद्रियांच्या द्वारे होत असते. या पाच इंद्रियांना शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच विषय कळत असतात. इंद्रियजन्य ज्ञानाचे हे पाचही विषय माणसाला दृश्य म्हणजे प्रत्यक्ष प्रमाणाने कळणारे असतात. या पाच विषयांना जाणून घेणारा ज्ञाता त्या दृश्य पदार्थांपेक्षा वेगळा असतो, हे उघड आहे. या दृश्य पदार्थांना पहाणारा / दृक् / जाणणारा / द्रष्टा / ज्ञाता हा आत्मा आहे. आणि सर्व दृश्य हे अनात्मा आहे. आत्मा सोडून जे जे काही ज्ञानाचा विषय होते, ते ते सर्व दृश्य आहे. आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी ही पाच महाभूते, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच विषय, पाच ज्ञानेंद्रिये, पाचही कर्मेंद्रिये, मन, चित्त, बुद्धि, अहंकार हे सर्व काही अनात्मा आहे.

आत्मा हा सच्चिदानंद, नित्य आहे तर अनात्मा हा जड / अचेतन आणि अनित्य आहे. अशा प्रकारे जरी त्यांचे स्वरूप भिन्न आहे, तरी लौकिक व्यवहारात अज्ञानी / अविवेकी मनुष्य त्यांची गल्लत करीत असतो. व्यवहारात आपण " मी" "मी" म्हणत असतो. केवलाद्वैत - मतानुसार, खरे म्हणजे हा " मी" म्हणजे आत्मा आहे. पण आपण शरीर, इंद्रिय, मन, इत्यादींपैकी कशाला तरी " मी" म्हणून, आत्मा व अनात्मा यांचे ऐक्य मानतो. जसे आपण म्हणतो "मी उंच आहे". खरे म्हणजे शरीर उंच आहे. पण शरीराला " मी" म्हणजे आत्मा मानून आपण तसे म्हणतो." मी काणा आहे ", या वाक्यात डोळा काणा आहे; आणि त्या डोळा या इंद्रियाला मी म्हणजे आत्मा असे मानून आपण तसे म्हणतो.मन अस्वस्थ असले की आपण म्हणतो," मी अस्वस्थ आहे." येथेही मनाला मी म्हणजे आत्मा मानून आपण तसे म्हणतो. खरे तर माझे शरीर, माझा डोळा, माझे मन, इत्यादि शब्दप्रयोगावरून मी व शरीर इत्यादि वेगळे आहेत हे कळते. ही गोष्ट जरा विवेक केला तर कळते. म्हणजेच विवेकी माणसाला आत्मा व अनात्मा यांतील फरक कळून येतो. आत्मा हा ज्ञाता / द्रष्टा आहे; आत्म्याखेरीज अन्य सर्व दृश्य पदार्थ अनात्मा आहेत म्हणजे ते आत्मा नाहीत. आत्मा आणि अनात्मा या दोहोंतील हा भेद विवेक करणाऱ्या पुरुषाला कळून येतो.

**आत्मानात्मविवेक :**

विवेक म्हणजे दोन वस्तूंतील फरकाचे ज्ञान. आत्मा आणि अनात्मा यांतील फरकाचे ज्ञान अविवेकी / विवेकरहित माणसाला नसते. मात्र ते विवेकी माणसाला असते. विवेकी माणसा-जवळ "आत्मानात्म-विवेक" असतो.

हा आत्मानात्मविवेक कोट्यवधी ग्रंथात सांगितला आहे, असे येथे म्हटले आहे. येथे कोट्यवधी ग्रंथ ही अतिशयोक्ति म्हणता येईल.

आत्मा आणि अनात्मा यांचे स्वरूप याच ग्रंथात खंड ३७-३८ मध्ये सांगितलेले आहे.

* * *

आत्मा आणि अनात्मा यांतील भेद स्पष्ट करुन सांगणे हा प्रस्तुत ग्रंथाचा विषय आहे असे पुढील खंड २ मध्ये सांगितले आहे.

(२)

**आत्मानात्म-विवेकः कथ्यते ।।२।।**

**(आता यापुढे ) आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक (ग्रंथकाराकडून) सांगितला जात आहे (२).**

आत्मा आणि अनात्मा या दोहोंत मूलतः भेद आहे. तो उलगडून दाखविणेचे कार्य या ग्रंथात केलेले आहे.

* * *

येथे असा एक प्रश्न उद्भूत होतो : आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक हा कशासाठी करावयाचा ? काहीतरी प्रयोजन असल्याशिवाय मनुष्य एकादी गोष्ट करण्यास प्रवृत्त[१] होत नाही. तेव्हा आत्मानात्मविवेक करण्याला काही प्रयोजन आहे की नाही ? या प्रश्नाचे उत्तर " प्रयोजन आहे " असे आहे. ते असे : या जगात सर्व माणसांना दुःख भोगावे लागते. दुःख दूर होऊन सतत सुख मिळावे, सतत आनंद रहावा असे प्रत्येकाला वाटत असते. आता जर दुःखाचे कारणच दूर झाले तर दुःख संपेल हे स्पष्ट आहे. आणि या दुःखाचे कारण दूर करण्यास आत्मानात्मविवेक उपयोगी आहे. दुःखाच्या कारणाच्या निरासासाठी आत्मानात्मविवेक आवश्यक ठरतो.

दुःखाच्या कारणाचे निराकरण आत्मानात्मविवेकामुळे होते. दुःखाचे हे मूळ/अंतिम कारण कोणते, ते पुढील खंड ३-११ मध्ये सांगितले आहे.

---

१. प्रयोजनं विना न मन्दोऽपि प्रवर्तते।

(३)

**आत्मन: किंनिमित्तं दु:खम् । शरीरपरिग्रह - निमित्तम् ।**
**" नेह वै सशरीरस्य सत: प्रियाप्रिययोरपहतिरस्ति" इति श्रुते: ।।३।।**

**(प्रश्न:-) आत्म्याला कोणत्या कारणाने दु:ख प्राप्त होते ? (उत्तर :-) शरीरधारण झाले आहे या कारणाने ( दु:ख होते ; आणि ही गोष्ट) " या जगात शरीर धारण करून असणाऱ्या माणसाच्या बाबतीत, प्रिय (=सुख) आणि अप्रिय (=दु:ख)यांचा नाश नसतो", या श्रुतीच्या वचनावरून कळून येते (३).**

या जगात माणसाला तीन प्रकारची दु:खे भोगावी लागतात. त्यांना त्रिविध ताप असे म्हणतात. आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक असे त्रिविध ताप आहेत (यांचे अधिक विवेचन पुढे खंड ४३ मध्ये पहा). खरे म्हणजे दु:ख हे आत्म्याला होत नसते, तर ते मनाला होत असते. तथापि व्यवहारात मनालाच आत्मा मानले जात असल्याने, आत्मा हा दु:खी होतो असे चुकीने म्हटले जाते. जे जसे नाही ते तसे आहे असे मानणे / वाटणे म्हणजे अध्यास [१] होय. मन आत्मा नसताना, मनाला आत्मा असे समजणे म्हणजे मनावर आत्म्याचा अध्यास करणे होय.

आता मनाला जे दु:ख होते याचे कारण असे : भारतीय कर्मवादानुसार कर्माअंती माणसाला जन्म मिळत असतो. जन्म म्हणजे शरीरधारण. आणि जोपर्यंत इंद्रियांसह शरीर जिवंत असते, तोपर्यंत इंद्रिये आणि विषय यांच्या संयोग-वियोगाअंती होणारे दु:ख टळत नाही. या संदर्भात भगवद्गीता सांगते, " इंद्रिय आणि विषय यांचे संयोग हे शीत-उष्ण [२] व सुख-दु:ख देत असतात." वेगळ्या शब्दांत, जोपर्यंत शरीरधारण आहे, तोपर्यंत सुखदु:ख संपत नाही. शरीरधारण हेच दु:खाचे कारण आहे. या म्हणण्याला शंकराचार्यांनी " नेह वै सशरीरस्य ..... रस्ति" असा श्रुतीचा (म्हणजे छांदोग्य उपनिषद् , ८.१२.१) आधार दिला आहे. श्रुति म्हणजे वेद. शंकराचार्यांच्या मते, वेद हे ज्ञानाचे सर्वोच्च प्रमाण आहे. शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान हेही श्रुतीवर / वेदावर आधारलेले आहे. वेदाच्या अन्त्यभागी उपनिषदे येतात. शंकराचार्यांनी उद्धृत केलेले श्रुतिवचनही सांगते की जिवंत असणाऱ्या माणसाचे सुख-दु:ख चुकत नाही.

---

१ .अध्यासो नाम अतस्मिन् तद्बुद्धि: । शंकराचार्यांचे ब्र. सू. वरील अध्यासभाष्य

२ . मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदु:खदा: । भगवद्गीता २.१४

**(४)**

**शरीरपरिग्रहः केन भवति । कर्मणा ।।४।।**

**(आत्म्याच्या संदर्भात) शरीराचे ग्रहण / धारण हे कोणत्या कारणामुळे होते ?**

**(उत्तर:- कर्मांमुळे) (४).**

कर्मांमुळे शरीरग्रहण होते याचा खुलासा असा :- काया, वाचा, आणि मन यांच्या द्वारा माणूस कर्मे करीत असतो. कर्म ही एक प्रकारची जड शक्ति आहे. कर्म हे आपले कार्य/ परिणाम / फळ निर्माण करीत असते आणि ते फळ कर्म करणाऱ्याला भोगावे लागते. आता काही कर्मे अशी असतात की त्यांचे फळ जीवनात लगेच मिळते.उदा. पेटत्या निखाऱ्याला हात लावला की लगेच भाजते. काही कर्मांचे फळ विशिष्ट काळानंतर प्राप्त होते. उदा. बीज पेरल्यानंतर विशिष्ट काळाने अंकुर इत्यादि येतात तर काही कर्मे अशी असतात की त्यांचे फळ चालू जीवन संपले तरी मिळत नाही. अशा कर्मांचे फळ भोगण्यास माणसाला पुनः जन्म घ्यावा लागतो. जन्म घेणे म्हणजेच शरीर धारण करणे होय. अशा प्रकारे कर्म - जन्म (= शरीरधारण) - कर्म -जन्म / शरीरधारण असे हे जन्म -कर्म-जन्म यांचे रहाटगाडगे म्हणजेच कर्म व जन्म / शरीरधारण यांचे चक्र सतत चालू रहते; हाच संसार. आत्मज्ञानाने संसार संपून मोक्ष मिळेपर्यंत हे चक्र चालू रहाते.

मी कर्ता आहे असा अहंकार आणि आसक्ति बाळगून केली जाणारी कर्मेच माणसाला कर्मांच्या बंधनात पाडतात. म्हणजे तीच पुनः जन्ममरणाप्रत नेत असतात.

**(५)**

**कर्म केन भवतीति चेत् , रागादिभ्यः ।।५।।**

**" कर्म कोणत्या कारणामुळे केले जाते",असे जर विचारले तर आसक्ति (राग) इत्यादीमुळे (कर्म केले जाते, असे त्या प्रश्नाचे उत्तर आहे) (५).**

शरीरधारी मनुष्य कर्मे करीत असतो. या कर्मांना प्रेरणा असते राग इत्यादि विकारांची. राग-आदि म्हणजे राग, द्वेष इत्यादी विकार होत. म्हणजे घडते ते असे : या जगात एकाद्या गोष्टीविषयी माणसाला राग / आसक्ति/ प्रेम / अभिलाषा वाटू लागली की ती गोष्ट प्राप्त करुन घेण्याचा प्रयत्न / कर्म तो सुरू करतो. तसेच जी वस्तु नको आहे, ज्या वस्तूचा द्वेष वाटतो, ती वस्तु दूर करण्यास अथवा नष्ट करण्यास कर्म केले जाते. तसेच क्रोध, लोभ, मोह, असूया, ईर्ष्या इत्यादि विकारही माणसाला कर्मे करण्यास प्रवृत्त करतात. अशाप्रकारे राग, द्वेष, इत्यादि विकार हे कर्मांचे प्रेरक कारण होतात.

## (६)

### रागादयः कस्माद् भवन्तीति चेत्, अभिमानात् ॥६॥

**राग, इत्यादि (विकार) कशापासून (उत्पन्न) होतात, असे जर विचारले, तर "अभिमानापासून" (असे त्याचे उत्तर आहे) (६).**

अभिमान म्हणजे अहंकार, शरीर, इंद्रिये इत्यादि पदार्थ अनात्मा आहेत. त्या पदार्थांवर अध्यास करून, ते पदार्थ म्हणजे आत्मा आहेत असे मानून, "मी -मला- माझे" असा अभिनिवेश धरणे म्हणजे अहंकार धारण करणे होय. उदा. मी उंच आहे; मी गोरा आहे; मी उदार आहे; मला पैसा हवा आहे; मला स्वतःचे सुंदर घर पाहिजे आहे; पत्नी, पुत्र, आईबाप, शेतीवाडी इत्यादि माझे आहेत; असे आपण नेहमीच्या व्यवहारात म्हणत असतो. आपला हा सर्व व्यवहार अहंकारावर आधारलेला आहे; अहंकारामुळेच असला व्यवहार होतो. आणि अहंकारामुळेच राग, द्वेष, इत्यादि विकार उफाळून येतात. जसे :- स्वतःला सुख मिळावे म्हणून द्रव्य कमावले. पुढे द्रव्याचा लोभ सुटला. द्रव्य कुणी लुबाडले तर क्रोध येतो. ज्याने लुबाडले त्याच्याविषयी द्वेष वाटू लागतो. तसेच, आपल्यापेक्षा अधिक मालमत्ता ज्याच्याजवळ आहे, त्याच्याविषयी मत्सर / असूया निर्माण होते. फारच पैसा जवळ झाला किंवा हातात सत्ता / अधिकार आला की मद चढतो व मस्ती येते. अशाप्रकारे अभिमानामुळे राग, द्वेष इत्यादि विकारांची उत्पत्ति होते.

## (७)

### अभिमानोऽपि कस्माद् भवति । अविवेकात् ॥७॥

**(प्रश्न :-) अहंकार हा तरी कशामुळे निर्माण होतो ? (उत्तर:-) अविवेकामुळे (अहंकार उत्पन्न होतो) (७)**

वर खंड ६ खाली पाहिल्याप्रमाणे अहंकाराची भावना ही आत्म्याखेरीज अन्य अशा अनात्म पदार्थावर असते. आत्मा सोडून अन्य सर्व अनात्मा आहे. त्यांना आत्मा मानण्याने, शरीर इत्यादि अनात्म वस्तूंना आपण आत्मा मानू लागतो. वस्तुतः "मी" चे खरे स्वरूप आत्मा / अंतरात्मा हेच आहे. तथापि आत्मा आणि अनात्मा यांतील फरक न कळल्याने, माणूस हा अनात्म पदार्थांनाच आत्मा मानू लागतो. आत्मा आणि अनात्मा यांतील भेदाचे ज्ञान म्हणजे विवेक; या विवेकाचा अभाव म्हणजे अविवेक. या अविवेकामुळेच अनात्म वस्तूवर आत्माभिमान उत्पन्न होतो. अशाप्रकारे आत्मा आणि अनात्मा यांतील भेदाच्या ज्ञानाचा अभाव म्हणजेच अविवेक हाच अभिमानाचे / अहंकाराचे कारण बनतो.

(८)

**अविवेक: कस्माद् भवति । अज्ञानात् ॥८॥**

**(प्रश्न :-) अविवेक कशामुळे उत्पन्न होतो ? (उत्तर :-) अज्ञानामुळे (अविवेक उद्‌भूत होतो) (८).**

अविवेक हा अज्ञानापासून निर्माण होतो. ज्या अज्ञानापासून हा अविवेक उत्पन्न होतो ते अज्ञान म्हणजे व्यवहारातील अज्ञान नव्हे. तर ते शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानातील "अज्ञान" आहे. या अज्ञानाचे स्पष्टीकरण पुढील खंड ९ मध्ये आहे. या अज्ञानालाच कधी अविद्या अथवा माया असेही म्हटले जाते.

(९)

**अज्ञानं केन भवतीति चेत्, न केनापि । अज्ञानं नाम अनादि सदसद्भ्याम-निर्वचनीयं त्रिगुणात्मकं ज्ञानविरोधि भावरूपं यत् किंचिदिति वदन्ति, अहमज्ञ इत्याद्यनुभवात् । "देवात्मशक्तिं स्वगुणैर्निरूढां" इत्यादिश्रुते: ॥९॥**

**अज्ञान कोणत्या कारणाने निर्माण होते असे जर विचारले, तर त्याचे उत्तर "कशापासूनही नाही" असे आहे. अज्ञान हे अनादि, सत् आणि असत् या शब्दांनी वर्णन न करता येणारे, तीन गुणांनी युक्त, ज्ञानाला विरोधी, भावरूप आणि काहीतरी अद्‌भुत / विचित्र आहे, असे (शहाणे केवलाद्वैती लोक) सांगतात. (असले हे अज्ञान आहे हे कशावरून, या प्रश्नाचे उत्तर असे :-) "मी अज्ञ आहे" (या स्वरूपात माणसाला येणाऱ्या) अनुभवावरून (अज्ञान आहे हे कळते. तसेच) "स्वत:च्या गुणांनी प्रचलित झालेल्या देवाच्या स्वत:च्या शक्तीला" (ऋषींनी जाणले) या श्रुतीच्या वचनावरूनही (असले अज्ञान आहे हे कळून येते) (९).**

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानात जे "अज्ञान" मानलेले आहे, त्याचे कारण अमुकच आहे असे सांगता येत नाही. ही अज्ञानाची संकल्पना अशी आहे :-

अज्ञान हे अनादि आहे. अज्ञानाला कोणतेही कारण नाही. अज्ञानाचा आदि / आरंभ केव्हा, कसा, कुठे झाला हे ज्ञात नाही. म्हणून त्याला अनादि म्हटले आहे. आता, अज्ञान हे जरी अनादि आहे तरी ते अनंत / अंतरहित मात्र नाही. कारण या अज्ञानाचा नाश / निरास होऊ शकतो. आत्म्याचे म्हणजेच ब्रह्माचे सम्यग् ज्ञान झाले की हे अज्ञान नष्ट होऊन जाते. म्हणून हे अज्ञान अनादि असले तरी ते सान्त (= शेवट / नाश असणारे असे) आहे.

अज्ञान हे सदसदनिर्वचनीय आहे. म्हणजे ते सत् किंवा असत् या शब्दांनी सांगता

येण्यासारखे नाही. याचे सविस्तर स्पष्टीकरण असे :-सत् म्हणजे ते की जे तीनही काळांत - वर्तमान, भूत व भविष्य या काळांत- नित्य अस्तित्वात असते. याप्रकारे अज्ञान हे सत् नाही; कारण आत्मज्ञानाने त्याचा नाश होतो; ते तीनही काळांत टिकणारे नाही; आत्मज्ञान होताच ते लयाला जाते. केवळ आत्मा हा सत् आहे; त्या आत्म्याप्रमाणे अज्ञान हे सत् नाही; म्हणून सत् हा शब्द वापरून त्याचे वर्णन करता येत नाही. आता, असत् म्हणजे ते की जे कधीच प्रतीतीला येत नाही. जसे :- वांझ स्त्रीचा पुत्र, सशाचे शिंग, इत्यादि गोष्टी कधीच प्रतीतीला येत नाहीत; म्हणून त्यांना असत् म्हणता येते. अज्ञान हे अशाप्रकारे असत् नाही. कारण ते माणसाच्या प्रतीतीला येणारे आहे. "आपण अज्ञानयुक्त आहोत" अशी जाणीव प्रत्येकाला अथवा काहींना कधी ना कधी तरी येतच असते. आणि ज्याची प्रतीती येते, ते असत् आहे असे कसे म्हणता येईल ? तसेच, जे असत् आहे त्यातून अन्य काही निर्माण होऊ शकत नाही. उदा. सशाच्या शिंगापासून सुगंध उत्पन्न होऊ शकत नाही. पण अज्ञान तसे असत् नाही; कारण अज्ञानापासून विश्वाची उत्पत्ति होते ( खंड ३७ खाली पहा).म्हणूनही अज्ञानाला असत् म्हणता येत नाही. आता, अज्ञान हे सत् आणि असत् असे दोन्हीही आहे, असेही म्हणता येत नाही; कारण ते त्या दोहोंपेक्षा वेगळे आहे; ते सतही नाही व असतही नाही असे वर दाखविले आहेच. आणखी असे :- सत् आणि असत् हे परस्पर -विरोधी असणारे गुणधर्म हे एकाच वेळी एकाच अज्ञान या पदार्थाच्या ठिकाणी एकत्र असणे हे संभवतच नाही. अशाप्रकारे अज्ञान हे सत् आहे, असत् आहे, किंवा सत् व असत् असे दोन्हीही आहे, असे म्हणता येत नाही. म्हणून अज्ञान हे सदसदनिर्वचनीय आहे म्हणजे सत् किंवा असत् शब्दाद्वारे वर्णन करता येण्यासारखे नाही.

अज्ञान भावरूप आहे. हे अज्ञान म्हणजे ज्ञानाचा अभाव नव्हे, ही गोष्ट सांगण्यास त्याला भावरूप म्हटले आहे. तथापि ते भावरूप आहे म्हणजे आत्म्याप्रमाणे सत् (भावरूप) आहे असा मात्र अर्थ नाही. कारण 'काहीतरी असणारे 'असे हे अज्ञान आत्मज्ञानाने नष्ट होऊन जाते. तेव्हा भावरूप म्हणजे काही काळ असणारे / भासणारे परंतु ज्ञानाने संपून जाणारे, असा अर्थ घेता येतो.

अज्ञान त्रिगुणात्मक म्हणजे तीन गुणांनी बनलेले आहे. हे तीन गुण म्हणजे सत्त्व, रज आणि तम हे गुण होत. हे तीन गुण मिळून अज्ञान बनलेले आहे. अज्ञान हे त्रिगुणात्मक आहे हे पुढील दोन कारणांवरुन कळून येते :- (१) अज्ञान हे जगाचे कारण आहे. जगातील प्रत्येक वस्तु ही सुख, दु:ख तसेच मोह देणारी आहे; म्हणजे प्रत्येक वस्तूत सुख, दु:ख व मोह हे तीन धर्म आहेत.उदा. एकच तरुण स्त्री ही पतीला सुखकारक, सवतींना दु:खदायक, आणि पर पुरुषांना

मोहकारक असते. आता जग हे कार्य व अज्ञान हे त्याचे कारण आहे.कारणाचे गुणधर्म कार्यात उतरतात. जसे :- चंदनी लाकडाचे गुणधर्म चंदनी लाकडापासून बनविलेल्या पदार्थांत येतात. तेव्हा कार्याच्या गुणांवरून कारणाचे गुणधर्म ठरविता येतात. म्हणून कार्यरूप जगातील सुख-दु:ख-मोह या धर्मांचे कारण असणारे सत्त्व-रज-तम हे तीन गुण अज्ञान या कारणात असले पाहिजेत असे अनुमान करता येते. (२) आणखी असे :- श्रुतीच्या वचनावरूनही अज्ञान हे त्रिगुणात्मक आहे हे समजते. श्रुतीचे -श्वेताश्वतर उपनिषदाचे- वचन (४.५) असे आहे : " लोहित-शुक्ल-कृष्ण असणारी एक अजा" (अजामेकां लोहित-शुक्ल-कृष्णाम्). येथे माया (=अविद्या, अज्ञान) ही लोहित- शुक्ल- कृष्ण[१] आहे म्हणजे सत्त्व -रज-तमात्मक आहे असे म्हटले आहे. अशाप्रकारे अनुमान आणि वेदवचन यांच्या आधारे अज्ञान हे त्रिगुणात्मक आहे हे कळून येते.

अज्ञान हे "यत् किंचित् आहे". म्हणजे असे :- अज्ञान हे सत् आणि असत् यांपेक्षा वेगळे आहे. ज्याप्रमाणे नपुंसक हा स्त्री आणि पुरुष यांच्यापेक्षा भिन्न असतो, त्याप्रमाणे अज्ञान हे सत् आणि असत् यांपेक्षा निराळे आहे. म्हणूनच ते काहीतरी वेगळे, अद्‌भुत आहे, असे ज्ञाते लोक म्हणतात.

अज्ञान हे ज्ञान-विरोधी आहे. अंधार प्रकाशाला विरोधी असतो. म्हणून प्रकाशाने अंधार नष्ट होतो. त्याप्रमाणे अज्ञान हे आत्म्याच्या / ब्रह्माच्या ज्ञानाने नि:शेष नष्ट होऊन जाते. अज्ञान हे ज्ञानविरोधी आहे याचा अर्थ ते ज्ञानाने नष्ट होऊन जाणारे आहे.

असले हे जे अज्ञान आहे, त्याच्या सिद्धीसाठी माणसाचा अनुभव आणि वेद यांचा आधार शंकराचार्यांनी येथे दिला आहे :- (१) ' मी अज्ञानी आहे ' अशा प्रकारचा अनुभव माणसाला या जगात येत असतो. तेव्हा ज्याचा अनुभव येतो ते असावयास हवे (२) वेद सांगतो : ध्यानयोगाने त्या ऋषींना " स्वत:च्या गुणांनी प्रचलित असणारी ईश्वराची स्वत:ची शक्ति" कळून आली. येथे ईश्वराची स्वत:ची शक्ति म्हणजेच मायाशक्ति. ही माया म्हणजेच अविद्या / अज्ञान आहे.

हे अज्ञानच दु:खाचे मूळ कारण आहे, ही गोष्ट पुढील १० व्या खंडावरून स्पष्ट होते.

## (१०)

**तस्मादज्ञानादविवेको जायते ।अविवेकादभिमानो जायते । अभिमानाद् रागादयो जायन्ते। रागादिभ्य: कर्माणि जायन्ते । कर्मभ्य: शरीरपरिग्रहो जायते । शरीरपरिग्रहाद् दु:खं जायते ॥१०॥**

---

१. येथे शुक्ल=पांढरा (=सत्त्व), लोहित=लाल(=रज), आणि कृष्ण=काळा(=तम) असे जाणून घ्यावयाचे आहे.

**आत्मानात्मविवेक :**

**(अशा प्रकारे) त्या अज्ञानापासून अविवेक जन्मतो. अविवेकापासून अभिमान/ अहंकार उत्पन्न होतो. अभिमानामुळे राग इत्यादि निर्माण होतात. राग इत्यादीमुळे कर्मे उद्‌भूत होतात. कर्माअंती शरीराचे ग्रहण होते आणि शरीरग्रहणाअंती दु:खाचा प्रादुर्भाव होतो (१०).**

माणसाच्या दु:खाचे कारण काय, असा प्रश्न वर खंड ३ मध्ये विचारला होता. या दु:खाची कारणपरंपरा आत्तापर्यंतच्या विवेचनावरुन अशी ठरते : ( मूल कारण) अज्ञान - अविवेक - अभिमान - रागादि (विकार) - कर्मे - शरीरपरिग्रह - दु:ख. यावरून समजून येते की मानवी दु:खाचे मूळ कारण (आत्मविषयक) अज्ञानात आहे.

* * *

आता या दु:खाची निवृत्ति व्हावे असे वाटत असेल, तर उलट क्रमाने मागे जात अज्ञानाची निवृति व्हावयास हवी. हीच गोष्ट पुढील ११ व्या खंडात मांडली आहे.

**(११)**

**दु:खस्य कदा निवृत्तिः । सर्वात्मना शरीरपरिग्रहनाशे सति दु:खस्य निवृत्तिः भवति । सर्वात्मपदं किमर्थम् । सुषुप्त्यवस्थायां दु:खे निवृत्तेऽपि पुनरुत्थानसमये उत्पद्यमानत्वाद् वासनात्मना स्थितं भवति । अतस्तन्निवृत्त्यर्थं सर्वात्मपदम् । शरीरपरिग्रहनिवृत्तिः कदा भवति । सर्वात्मना कर्मणि निवृत्ते सति। कर्मनिवृत्तिः कदा भवति ।सर्वात्मना रागादौ निवृत्ते सति। रागादिनिवृत्तिः कदा भवति। सर्वात्मना अभिमाने निवृत्ते सति । कदा अभिमान-निवृत्तिः । सर्वात्मना अविवेके निवृत्ते सति। कदा अविवेक-निवृत्तिः । सर्वात्मना अज्ञाने निवृत्ते सति। कदा अज्ञान-निवृत्तिः । ब्रह्मात्मैकत्वे जाते सति अविद्यानिवृत्तिः सर्वात्मना भवति ।।११।।**

**(प्रश्न :-) दु:खाची निवृत्ति केव्हा होते ? (उत्तर :-) शरीरधारणेचा संपूर्णपणे नाश झाला असताना दु:खाची निवृत्ति होते. (प्रश्न:-) (या वाक्यात) " सर्वात्मना " (= संपूर्णपणे) हा शब्द कशासाठी वापरला आहे ? (उत्तर :-) निद्रा-अवस्थेमध्ये दु:ख निवृत्त होत असले, तरी पुन: जागृतीच्या काळात (शरीरधारणेची जाणीव व त्याअंती असणारे दु:ख हे ) उत्पन्न होत असल्याने, (ती शरीरधारणेची जाणीव) वासनारूपाने शिल्लक राहिलेली असते (हे उघड आहे). म्हणून (वासनारूपात असणाऱ्या शरीरधारणेच्या जाणीवेची) ती निवृत्ति (अपेक्षित आहे हे) सुचविण्यासाठी " सर्वात्मना " हा शब्द येथे वापरलेला आहे. (प्रश्न :-) शरीरधारणेची निवृत्ति केव्हा होते ? (उत्तर :-) कर्मे संपूर्णपणे निवृत्त झाली असताना (म्हणजे कर्मांचा संपूर्णपणे नाश झाला असताना). (प्रश्न:-) कर्मांची निवृत्ति केव्हा होते ? (उत्तर :-) राग इत्यादि संपूर्णपणे**

**निवृत्त झाले असताना. (प्रश्नः-) राग इत्यादींची निवृत्ति केव्हा होते ? (उत्तर :-) अभिमान / अहंकार हा संपूर्णपणे निवृत्त झाला असताना. (प्रश्न):- अभिमानाची निवृत्ति केव्हा होते? (उत्तर:-) अविवेक हा संपूर्णपणे निवृत्त झाला असताना. (प्रश्न :-) अविवेकाची निवृत्ति केव्हा होते ? (उत्तर:-) अज्ञान हे संपूर्णपणे निवृत्त झाले असताना. (प्रश्न :-) अज्ञानाची निवृत्ति केव्हा होते ? (उत्तर:-) ब्रह्म आणि आत्मा (हे एकच आहेत हे ज्ञान होऊन, त्या दोघांची) यांची संपूर्णपणे एकरूपता झालीअसताना, अविद्येची संपूर्णपणे निवृत्ति होते (११).**

शरीराच्या देहधारणेअंती दु:ख आहे. तेव्हा दु:खाचा नाश व्हावयाचा असल्यास, ही देह-धारणा संपूर्णपणे नष्ट व्हावयास हवी. देहधारण म्हणजे जिवंत शरीराची मी - मला- माझे या स्वरूपात जाणीव असणे. ही जाणीव निद्रा या अवस्थेत तात्पुरती लयाला जाते, व तेवढ्या काळापुरता दु:खाचा निरास होतो; निद्रेत दु:खाची जाणीव होत नाही; परंतु झोपेतून जागे झाले की देहाची पुन: जाणीव होते व पुन: दु:ख जाणवू लागते. कारण वासनारूपाने शरीराची जाणीव झोपेतही असतेच. शरीरधारणेचा संपूर्ण नाश म्हणजे जन्ममरणाचे चक्र संपूर्णपणे थांबणे होय. तसे झाले तरच दु:खाची आत्यन्तिक म्हणजे कायमची निवृत्ति होते.

वर खंड ३ ते १० मध्ये दु:खाची कारणपरंपरा सांगितली आहे. कार्य हे कारणामुळे निर्माण होते. आता, जर कारणच नष्ट झाले तर कार्य उत्पन्नच होणार नाही. जसे :- बीज नष्ट झाले तर अंकुर फुटणारच नाही. या सिद्धांताला अनुसरून, दु:ख नष्ट होण्यास त्याची कारणे कसकशी नष्ट होत गेली पाहिजेत, हे प्रस्तुत खंड ११ मध्ये सांगितले आहे. दु:खाचे मूलभूत कारण अज्ञान आहे. ते नष्ट होण्यास ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्याचे ज्ञान होऊन, त्या दोघांचे एकत्व व्हावयास हवे. वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास, ब्रह्मात्मैक्याच्या साक्षात्काराने अज्ञान लयाला गेले की दु:खाचा संपूर्णपणे नाश होतो. आपण स्वत:च सुखस्वरूप / आनंदस्वरूप असणारे ब्रह्म (आत्मा) आहोत या साक्षात्कारजन्य ज्ञानाने अज्ञान नष्ट होते. साहजिकच अज्ञानजन्य दु:ख संपूर्णपणे लयाला जाते.

* * *

ब्रह्मात्मैक्याच्या ज्ञानाने अज्ञान निवृत्त होते, या म्हणण्यावर एक शंका उपस्थित करून, तिचे समाधान शंकराचार्य पुढील १२ व्या खंडात करतात. शंका अशी :- संध्यावंदन इत्यादि नित्य कर्मे करण्यास शास्त्राने सांगितले आहे. ही कर्मे केल्याने पुण्याची प्राप्ति होत नाही, परंतु ती न केल्यास प्रत्यवाय म्हणजे अडचणी येतात आणि भविष्यकाळात दु:ख निर्माण होते. आता आमचे म्हणणे असे आहे की शास्त्राने ही जी नित्यकर्मे सांगितली आहेत,त्यांचा उद्देश अविद्येचा निरास व्हावा असाच आहे. हे मत शंकराचार्यांना मान्य नाही. ते सांगतात :-

(१२)

**ननु नित्यानां कर्मणां विहितत्वात्, नित्येभ्य: कर्मभ्य: अविद्यानिवृत्ति: स्यात्, किमर्थं ज्ञानेन, इत्याशंक्य, न कर्मादिना अविद्या-निवृत्ति: । तत्कृत इति चेत्, कर्म -ज्ञानयोर्विरोधो भवेत् । अतो ज्ञानेनैव अज्ञाननिवृत्ति: ।।१२।।**

**(शंका :) नित्य (करावयाची) कर्मे (शास्त्राने) विहित केलेली असल्याने, त्या नित्य कर्मांमुळेच अविद्येची निवृत्ति होईल; मग ज्ञानाचा काय उपयोग आहे ? अशी शंका आल्यास (तिचे समाधान असे :-) ' कर्म इत्यादींनी अविद्येची निवृत्ति होत नाही. ते (तसे) का बरे'? असा जर प्रश्न केला तर त्याचे उत्तर असे की कर्म व ज्ञान यांतच विरोध आहे; म्हणून ज्ञानानेच अज्ञानाची निवृत्ति होते (१२).**

नित्य कर्मांनी किंबहुना कोणत्याच कर्मांनी अज्ञानाची निवृत्ति होत नाही, याचे कारण प्रकाश-अंधार याप्रमाणे कर्म आणि अविद्या / अज्ञान यांमध्ये विरोध नाही. प्रकाश व अंधार यांत विरोध असल्याने, प्रकाशाने अंधाराचा निरास होतो. असा विरोध कर्म व अज्ञान यांमध्ये असता, तर कर्मांनी अज्ञानाची निवृत्ति झाली असती. परंतु कर्म व अज्ञान यांत विरोध नसल्याने, कर्मांनी अविद्येची निवृत्ति होत नाही. आत्मबोध या आपल्या ग्रंथातही शंकराचार्य सांगतात, "(अविद्या व कर्म यांत) विरोध नसल्याने , कर्म अविद्येची निवृत्ति करू शकत[१] नाही."

शास्त्राने जी नित्य कर्मे सांगितली आहेत त्यांचा उद्देश अविद्या -निवृत्ति असा नाही; त्यांचे प्रयोजन चित्ताची शुद्धि करणे असे आहे. वेदान्तसार या ग्रंथात सदानंद[२] मुनि सांगतात, " या नित्य इत्यादि कर्मांचे सर्वोच्च प्रयोजन आहे बुद्धीची म्हणजे अंत:करणाची / चित्ताची शुद्धि." शंकराचार्यसुद्धा आपल्या विवेकचूडामणि या ग्रंथात[३] म्हणतात, " कर्म हे चित्ताच्या शुद्धीसाठी आहे."

कर्म हे अज्ञानाला विरोधी नाही. याउलट प्रकाश व अंधार याप्रमाणे अविद्या-विद्या, अज्ञान-ज्ञान या परस्परविरोधी जोड्या आहेत. त्यामुळे केवळ ज्ञानानेच अज्ञानाचा नाश होतो. " प्रकाश ज्याप्रमाणे अंधकाराचा समूह नष्ट करून टाकतो, त्याप्रमाणे विद्या (=ज्ञान) हीच अविद्येचा नाश करून टाकते ", असे शंकराचार्यांचा आत्मबोध[४] हा ग्रंथ सांगतो.

---

१. अविरोधितया कर्म नाविद्यां विनिवर्तयेत् । आत्मबोध, ३

२. एतेषां नित्यादीनां (कर्मणां) बुद्धि -शुद्धि: परं प्रयोजनम् । वेदान्तसार

३. चित्तस्य शुद्धये कर्म । विवेकचूडामणि, ११

४. विद्या अविद्यां निहन्ति एव तेजस्तिमिरसंघवत् । आत्मबोध, ३

**आत्मानात्मविवेक :**

खंड ३ मध्ये अज्ञानाचे स्वरूप सांगताना, ते "ज्ञान-विरोधी" म्हणजे ज्ञानाने नष्ट होणारे आहे, असे म्हटले होते. तेही येथे लक्षात घ्यावे. तेव्हा आत्मज्ञानानेच अज्ञानाचा नाश होतो, हे म्हणणेच सयुक्तिक ठरते.

* * *

अज्ञानाचा नाश करणारे ज्ञान कसे प्राप्त होते व ते प्राप्त करून घेण्यास कोणता पुरुष पात्र / योग्य आहे, हे पुढील खंड १३ मध्ये सांगितले आहे.

(१३)

**तज्ज्ञानं कुत इति चेत्, विचारादेव भवति । आत्मानात्माविवेक-विषय-विचाराद् भवति । तस्मिन् विचारे को वा को वा अधिकारी । साधनचतुष्टयसंपन्नः अधिकारी । साधन-चतुष्टयं नाम नित्यानित्यवस्तुविवेकः इहामुत्रफलभोगविरागः शमादिषट्संपत्तिः मुमुक्षुत्वं चेति ।।१३।।**

**(अज्ञानाचा नाश करणारे) ते ज्ञान कोठून / कसे बरे प्राप्त होते, असे जर विचारले, तर त्याचे उत्तर असे आहे :- ( ते ज्ञान) विचारामुळेच प्राप्त होते. आत्मा आणि अनात्मा यांतील विवेक हाच विषय ज्या विचाराचा आहे, त्या विचारामुळे (ज्ञान प्राप्त) होते. (प्रश्न:-) त्या विचाराच्या बाबतीत म्हणजेच तो विचार करण्यास कोण कोण अधिकारी आहे ? (उत्तर :-) चार साधनांच्या समूहाने युक्त असणारा पुरुष हा अधिकारी आहे. आणि (या) चार साधनांचा समूह असा आहे :- १) नित्य आणि अनित्य वस्तूंचा विवेक २) इहलोकी तसेच परलोकी (कर्मांच्या) फळांचा भोग घेण्याची इच्छा नसणे (३) शम इत्यादि सहा गोष्टींची समृद्धि, आणि (४) मोक्ष मिळविण्याची इच्छा असणे (१३)**

अज्ञानाचा निरास करणारे जे ज्ञान आहे, ते विचार केल्याने प्राप्त होते. "विचार केल्यानेच ज्ञान होते", असे पंचदशीकार विद्यारण्यस्वामी[१] यांनी म्हटले आहे. हा विचार कशाचा आहे ? हा विचार आत्मा व अनात्मा यांत जो फरक आहे त्या विषयीचा आहे. या विचासने आत्मज्ञान होऊन अज्ञानाचा नाश होतो.

या जगात सर्व गोष्टी सर्वांसाठी नाहीत. तसेच सर्व गोष्टी सर्वांनाच करता येत नाहीत. साहजिकच आत्मानात्मविचार हा सर्वांनाच जमेल असे नाही. तर ज्याच्याजवळ विशिष्ट अधिकार / पात्रता असेल त्यालाच हा विचार जमू शकेल. म्हणून शंकराचार्य सांगतात की ज्या माणसाजवळ चार साधनांचा समुदाय आहे तोच आत्मानात्मविचार करण्यास योग्य / पात्र / लायक ठरतो.

---

१. विचाराज्जायते ज्ञानम् । पंचदशी. तसेच :- नोत्पद्यते विना ज्ञानं विचारेणान्यसाधनैः। शंकराचार्यकृत अद्वैतानुभूति,११

## आत्मानात्मविवेक :

या चारही साधनांची माहिती शंकराचार्य पुढे सांगतात :-नित्यानित्यवस्तुविवेकाची माहिती खंड १४ मध्ये, इहामुत्रार्थफलभोगविराग याचा तपशील खंड १५ मध्ये, शमादिषट्संपत्तीचा विस्तृत तपशील खंड १६ मध्ये, आणि मुमुक्षुत्व या चौथ्या साधनाचे विवेचन हे खंड ३३ मध्ये येते. या चार साधनांचा संबंध असा सांगता येईल :- नित्यानित्यवस्तुविवेक दृढ झाल्यावर वैराग्य (= इहामुत्रार्थफलभोगविराग) येते. वैराग्य बाणल्यावर शमादिषट्संपत्ति मिळू शकते. आणि या तीन गोष्टी ज्याला साध्य झाल्या, त्याच्या मनात मोक्षाची प्रबळ इच्छा उत्पन्न होते.

* * *

नित्यानित्यवस्तुविवेक या पहिल्या साधनाचे स्पष्टीकरण पुढील खंड १४ मध्ये शंकराचार्य देतात.

### (१४)

**नित्यानित्यवस्तुविवेको नाम ब्रह्म सत्यं जगन्मिथ्यैव इति निश्चय: ।।१४।।**

**नित्यानित्यवस्तुविवेक म्हणजे ब्रह्म हे (एकमेव) सत्य (नित्य) आहे आणि जग (=अनात्मा) मिथ्याच (अनित्य) आहे, असा (बुद्धीचा) निश्चय होणे होय (१४).**

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानात ब्रह्म म्हणजेच आत्मा आहे. हे ब्रह्म सत्य आहे. सत्य म्हणजे काय ? ज्या वस्तूला उत्पत्ति नाही, विनाश नाही, जी वस्तु भूत, वर्तमान आणि भविष्य या तीनही काळांत अस्तित्वात असते, ज्या वस्तूत फरक / विकार होत नाहीत, ती वस्तु सत्य म्हटली जाते. जी वस्तु अशी सत्य असते, ती नित्य असते. ब्रह्म ही अशी सत्य, नित्य वस्तु आहे.

ब्रह्माखेरीज / आत्म्याखेरीज जे काही जग आहे असे वाटते / भासते, ते सर्व आत्मा नसल्याने अनात्मा आहे. ते उत्पन्न होणारे, नाश पावणारे, विकार पावणारे आहे; म्हणून ते मिथ्या किंवा अनित्य आहे. जे सतत बदलते, नाश पावते, त्याला येथे मिथ्या किंवा अनित्य असे म्हटले आहे.

अशा प्रकारे ब्रह्मच / आत्माच सत्य व नित्य आहे आणि जग हे मिथ्या व अनित्य आहे म्हणजेच आत्मा नित्य आहे आणि अनात्मा अनित्य आहे, असा बुध्दीचा निश्चय झाला की नित्यानित्यवस्तुविवेक झाला.

* * *

इहामुत्रफलभोगविराग या दुसऱ्या साधनाचे स्पष्टीकरण पुढील खंड १५ मध्ये दिलेले आहे.

(१५)

**इह अस्मिन् लोके देहधारण - व्यतिरिक्त - विषये स्रक् -चंदन-वनितादि-संभोगे वान्ताशन-मूत्र-पुरीषादौ यथा इच्छा नास्ति तथा इच्छाराहित्यं इति इहलोकविराग: । अमुत्र स्वर्गलोकादि-ब्रह्मलोकान्त -वर्तिषु रंभोर्वश्यादि - संभोगादि - विषयेषु तद्वत् ॥१५॥**

येथे म्हणजे या जगात, ज्याप्रमाणे ओकलेले (पुन:) खाणे, मूत्र आणि विष्ठा इत्यादींच्या बाबतीत (भोग घेण्याची) इच्छा होत नाही, त्याप्रमाणे देहधारण सोडून अन्य विषयांत तसेच माळा, चंदन (-लेप), स्त्रीशी संभोग या बाबतीत इच्छा नसणे / इच्छेचा अभाव म्हणजे इहलोकाचे बाबतीतील विराग / वैराग्य होय. परलोकात स्वर्ग इत्यादि तसेच ब्रह्मलोक इत्यादीमध्ये असणारे जे रंभा-उर्वशी इत्यादीबरोबरचे संभोग इत्यादि विषय त्यांचे बाबतीत त्याप्रमाणेच म्हणजे वरीलप्रमाणेच इच्छेचा अभाव असणे म्हणजेच परलोकाचे बाबतीतील विराग होय (१५).

नित्यानित्यवस्तु-विवेकाने अनित्य वस्तूबद्दल प्रेम वा आसक्ति कमी कमी होते. त्यामुळे नित्यानित्यवस्तुविवेकाने वैराग्याच्या प्राप्तीला साहाय्य होते. विराग म्हणजे वैराग्य, विरक्ति, आसक्तीचा अभाव अथवा इच्छेचा अभाव. नित्यानित्यविवेकाने सर्व विश्व हे मिथ्या/ अनित्य आहे हे कळले आहे. त्यामुळेच अनित्य वस्तूविषयीची इच्छा सुटावयास हवी.

आपल्या पुराणानुसार विश्वात इहलोक / मृत्युलोक, पाताळ, स्वर्गलोक, इत्यादि आहेत, तसेच ब्रह्मदेवलोक इत्यादि आहेत. हे सर्व नाशवंत / अनित्य [१] आहेत. साहजिकच त्या लोकांत मिळणारी कर्मांची भोगरूप फळे अनित्य आहेत. अनित्य गोष्टींची इच्छा कशाला करावयाची ? म्हणून ते अनित्य भोग भोगण्याची इच्छा दूर व्हावयास हवी. भोग भोगण्याची इच्छा असल्यास, सर्व लक्ष भोगप्राप्तीकडे जाऊन, नित्य अशा ब्रह्माकडे / आत्म्याकडे जितके लक्ष देणे आवश्यक आहे तितके देता येणार नाही. म्हणून इहलोकातील -या जगातील- तसेच परलोकातील भोगविषयक इच्छेचा अभाव होऊन, अंगी वैराग्य बाणावयास पाहिजे. पुराणांच्या मते, रंभा व उर्वशी या इंद्रलोकातील सुंदर अप्सरा आहेत.

वैराग्यामुळे शम इत्यादि सहा गोष्टींची प्राप्ती होण्यास मदत मिळते.

* * *

---

१. आब्रह्मभुवनाल्लोका: पुनरावर्तिनोऽर्जुन । भगवद्गीता,८.१६

शमादिषट्संपत्ति या तिसऱ्या साधनातील सहा गोष्टींचे नावासह परिगणन खंड १६ मध्ये आहे.

(१६)

**शमादि-षट्कं नाम शम-दमोपरति-तितिक्षा-समाधानं श्रद्धा ॥१६॥**

**शम इत्यादि सहा गोष्टींचा समूह असा आहे :- १. शम २. दम ३. उपरति ४. तितिक्षा ५. समाधान, आणि ६. श्रद्धा**

शमाचे विवेचन यापुढील १७ व्या खंडात आहे.

(१७)

**शमो नाम अन्तरिन्द्रियनिग्रहः। अन्तरिन्द्रियं नाम मनः। तस्य निग्रहः श्रवण-मनन-निदिध्यासन-व्यतिरिक्त -विषयेभ्यो निवृत्तिः। श्रवणादौ वर्तमानत्वं वा शमः।।१७।।**

**शम म्हणजे आंतर इंद्रियाचा निग्रह / संयम. आंतर इंद्रिय म्हणजे मन. त्याचा निग्रह म्हणजे श्रवण, मनन आणि निदिध्यासन याखेरीजच्या अन्य विषयांतून (मनाची) निवृत्ति अथवा श्रवण इत्यादीमध्ये (मन गुंतून) रहाणे म्हणजे शम होय (१७).**

येथे शमाची दोन स्पष्टीकरणे दिलेली आहेत. पहिले स्पष्टीकरण असे :- मन या आंतर इंद्रियाचा निग्रह म्हणजे शम. शरीरातील इंद्रिये ही बाह्य आणि आंतर अशी दोन प्रकारची मानली जातात. शरीराच्या बाहेरील भागावर दिसत असून, बाहेरील विषयांशी संबंधित असणारी ती बाह्य इंद्रिये. उदा. डोळे, कान इत्यादि पाच ज्ञानेंद्रिये व हात, पाय इत्यादि पाच कर्मेंद्रिये ही बाह्य इंद्रिये होत (खंड २८पहा). याउलट शरीराच्या आत राहून आतील विचार इत्यादींचे ग्रहण करणारे ते आंतर इंद्रिय. उदा. मन. सर्वसामान्यपणे जरी आंतर इंद्रिय (= मन) आणि अंतःकरण एकच मानले जाते, तरी प्रस्तुत ग्रंथात शंकराचार्य अंतरिंद्रिय व अंतःकरण यांत थोडा भेद करताना दिसतात. त्यांच्या मते अंतरिंद्रिय म्हणजे मन आणि अंतःकरण म्हणजे मन, चित्त, बुद्धि व अहंकार (खंड ४७ पहा).हे मन इंद्रियांच्या मार्फत बाह्य विषयांकडे ओढ घेत असते. मनाचे हे बहिर्गमन बंद व्हावयास हवे. मन हे आत्म्याच्या संबंधातील श्रवण, मनन, व निदिध्यासन यांतच गुंतून राहिले पाहिजे. तसे होण्यास श्रवण, मनन, आणि निदिध्यासन यांखेरीजच्या अन्य सर्व विषयांतून मन निग्रहाने मागे वळविले पाहिजे. मग श्रवण, मनन व निदिध्यासन सोडून इतर विषयांतून मनाची निवृत्ति झाली की 'शम' प्राप्त झाला. (२) 'शम' चे दुसरे स्पष्टीकरण :- शम म्हणजे आत्म्याच्या संदर्भातील श्रवण, मनन व निदिध्यासन यांतच मन गुंतून रहाणे. अशाप्रकारे शमाची दोन स्पष्टीकरणे आहेत; तरी भावार्थ मात्र एकच आहे.

## आत्मानात्मविवेक :

शमाच्या विवेचनानंतर लगेच दमाचे विवरण अपेक्षित होते. तथापि शमाच्या स्पष्टीकरणात आलेल्या श्रवण, इत्यादींचे अधिक स्पष्टीकरण अगोदर करणे शंकराचार्यांना आवश्यक वाटले. म्हणून श्रवणाचे स्पष्टीकरण खंड १८-२५ मध्ये, नंतर मननाचे विवरण खंड २६ मध्ये, आणि त्यानंतर निदिध्यासनाचे विवेचन खंड २७ मध्ये शंकराचार्य करतात. ते झाल्यावर मग ते दम इत्यादींच्या विवेचनाकडे वळतात.

* * *

श्रवण म्हणजे काय हे खंड १८ असे सांगतो.

### (१८)

**श्रवणं नाम षड्विधलिंगैरशेष -वेदान्तानामद्वितीय-वस्तुनि तात्पर्यावधारणम् ॥१८॥**

**श्रवण म्हणजे सहा प्रकारच्या लिंगांच्या द्वारा, सर्व वेदान्तांचे म्हणजे उपनिषदांचे तात्पर्य हे अद्वितीय (अशा ब्रह्म या) वस्तूच्या ठिकाणी आहे, हे निश्चितपणे जाणणे होय (१८).**

श्रवण शब्दाचा जो तांत्रिक अर्थ अपेक्षित आहे, तो येथे स्पष्ट केला आहे. वेदान्त म्हणजे वेदाचा अन्त्य / शेवटचा भाग म्हणजेच उपनिषदे. ईश, केन, कठ, इत्यादि अनेक उपनिषदे आहेत. ही उपनिषदे आत्मा / ब्रह्म या अंतिम तत्त्वाचे प्रतिपादन करतात. हे ब्रह्म एकमेव अद्वितीय वस्तु आहे. आणि ब्रह्म या एकमेव अद्वितीय वस्तूचे प्रतिपादन करणे हे सर्व उपनिषदांचे तात्पर्य / सार / मुख्य उद्देश आहे, असे निश्चित ज्ञान म्हणजे श्रवण. वेगळ्या शब्दांत, उपनिषदांतील वाक्यांचे तात्पर्य म्हणजे ब्रह्म या अद्वितीय वस्तूचे प्रतिपादन, असे निश्चित ज्ञान झाले की श्रवण झाले.

येथे कुणी विचारील : उपनिषदांचे तात्पर्य कसे ठरवावयाचे ? याचे उत्तर असे :- एकाद्या ग्रंथाचे तात्पर्य ठरविण्यासाठी सहा प्रकारची लिंगे / गमके / खुणा / निकष / ज्ञापक संकेत आहेत आणि या सहा लिंगांचा वापर करून उपनिषदांचे तात्पर्य ठरविता येते.

ही सहा लिंगे कोणती ते शंकराचार्य सोदाहरण पुढील १९ ते २५ या खंडांत स्पष्ट करून सांगतात. (त्यानंतर ते मनन व निदिध्यासन यांचे विवरण करतात).

* * *

एकाद्या ग्रंथाचे किंवा प्रकरणाचे तात्पर्य निश्चित करण्यास उपयोगी पडणाऱ्या सहा लिंगांची नावे पुढील १९ व्या खंडात आहेत.

(१९)

**षड्विध - लिंगानि तु उपक्रमोपसंहाराभ्यासफलापूर्वतार्थवादोपपत्त्याख्यानि ॥१९॥**

**आणि (१) उपक्रम -उपसंहार (२) अभ्यास (३) फल (४) अपूर्वता (५) अर्थवाद, आणि (६) उपपत्ति, ही नावे असणारी सहा प्रकारची लिंगे आहेत (१९).**

एकाद्या ग्रंथात किंवा प्रकरणात अनेक विषय असू शकतात. तथापि तेथे एकादा विषय मुख्य म्हणून असतो. आणि तो मुख्य विषय म्हणजेच त्या ग्रंथाचे / प्रकरणाचे तात्पर्य होय. ते तात्पर्य कोणते हे ठरविण्यास सहा लिंगे म्हणजे बोधक / सूचक खुणा / चिन्हे असतात. ही सहा लिंगे येथे दिली आहेत. उपक्रम म्हणजे आरंभ व उपसंहार म्हणजे शेवट. उपक्रम व उपसंहार मिळून एकच लिंग मानले जाते. या सहाही लिंगांचा खुलासा पुढे क्रमाने केलेला आहे. तसे करताना शंकराचार्यांनी छांदोग्य उपनिषदातील सहावा अध्याय हे प्रकरण उदाहरण म्हणून घेतले आहे. या अध्यायात अद्‌वितीय अशा ब्रह्म वस्तूचेच प्रतिपादन आहे, हे सहाही लिंगांवरून कसे कळून येते, हे शंकराचार्य स्पष्ट करतात.

* * *

उपक्रम - उपसंहार या पहिल्या लिंगाचे सोदाहरण स्पष्टीकरण पुढील २० व्या खंडात आहे.

(२०)

**प्रकरणप्रतिपाद्यस्यार्थस्य तदाद्यन्तयोरुपपादनमुपक्रमोपसंहारौ। यथा छांदोग्ये षष्ठाध्याये प्रकरणप्रतिपाद्यस्याद्‌वितीयवस्तुनः एकमेवाद्‌वितीयमित्यादौ ऐतदात्म्यमित्यन्ते च प्रतिपादनम् ॥२०॥**

**एकाद्या प्रकरणात जो अर्थ म्हणजे विषय प्रतिपादन केला जात आहे, त्याचे आदि / प्रारंभी आणि अंती (त्या विषयाचे) उपपादन / निर्देश / कथन असणे म्हणजे उपक्रम -उपसंहार हे लिंग होय. जसे :- छांदोग्य (नावाच्या) उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात / प्रकरणात, प्रतिपादन करावयाच्या (ब्रह्म / आत्मा या) अद्‌वितीय वस्तूचा ' एकमेव अद्‌वितीय ' असा निर्देश प्रारंभी आहे, आणि हे सर्व विश्व या आत्म्याने युक्त / व्याप्त आहे असे कथन अंती आहे (२०).**

संस्कृत भाषेत प्रकरण शब्दाला अनेक अर्थ आहेत. प्रस्तुत स्थळी एकाद्या ग्रंथाचा एक विशिष्ट भाग या अर्थाने प्रकरण शब्द येथे वापरलेला आहे. छांदोग्य हे नाव असणाऱ्या उपनिषदाचा सहावा अध्याय हे प्रकरण येथे उदाहरण म्हणून घेतले आहे. या अध्यायाच्या प्रारंभी ' एक अद्‌वितीय' या शब्दांनी ब्रह्माचा निर्देश केला आहे, आणि शेवटी ' हे सर्व आत्म्याने / ब्रह्माने व्याप्त आहे ' या शब्दांनी त्याच ब्रह्माचा / आत्म्याचा निर्देश आहे.

अभ्यास या लिंगाचे सोदाहरण स्पष्टीकरण पुढील २१ वा खंड करतो.

**(२१)**

**प्रकरणप्रतिपाद्यस्य तन्मध्ये पौन:पुन्येन प्रतिपादनमभ्यास: । यथा तत्रैवाद्वितीयवस्तुनो मध्ये तत्त्वमसीति नवकृत्व: प्रतिपादनम् ॥२१॥**

**प्रकरणात ज्या विषयाचे प्रतिपादन केले जात आहे, त्या विषयाचे त्या प्रकरणाच्या मधल्या भागात पुन: पुन: कथन / प्रतिपादन म्हणजे अभ्यास होय. जसे :- तेथेच (म्हणजे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात) मधल्या भागामध्ये (ब्रह्म या) अद्वितीय वस्तूचे "ते (ब्रह्म) तू आहेस" या शब्दांनी नऊ वेळा प्रतिपादन झाले आहे (२१).**

छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायाच्या मधल्या भागात 'तत्त्वमसि' हे वाक्य नऊ वेळा पुनरुक्त झाले आहे. तत्त्वमसि वाक्यातील (तत् + त्वम + असि) तत् हे पद ब्रह्म या अद्वितीय वस्तूचा बोध करून देणारे आहे. अशाप्रकारे अद्वितीय ब्रह्म वस्तूचे पुनः पुन: प्रतिपादन आहे.

* * *

फल या लिंगाचे विवरण खंड २२ मध्ये आहे.

**(२२)**

**फलं तु प्रकरणप्रतिपाद्यस्यात्मज्ञानस्य तदनुष्ठानस्य वा तत्र श्रूयमाणं प्रयोजनम् । यथा तत्र आचार्यवान् पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्ये अथ संपत्स्ये इति अद्वितीयवस्तुज्ञानस्य तत्प्राप्ति: प्रयोजनं फलं श्रूयते ॥२२॥**

**फळ म्हणजे :- प्रकरणात प्रतिपादन केल्या जाणाऱ्या आत्मज्ञानाचे किंवा त्या (आत्मज्ञाना) साठी केल्या जाणाऱ्या (कर्माच्या) अनुष्ठानाचे तेथे तेथे (म्हणजे योग्य जागी) वर्णन केलेले अथवा श्रुतीने / वेदाने सांगितलेले प्रयोजन म्हणजे फळ होय. जसे :- तेथे (म्हणजे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात असे म्हटले आहे :-) "ज्याला आचार्य / गुरु आहे असा पुरुष (=ब्रह्म / आत्मतत्त्व )जाणतो; जोपर्यंत तो (शरीराच्या बंधनातून ) मुक्त होत नाही तोपर्यंतच त्याला (आत्मरूप / ब्रह्मरूप होण्यास) विलंब लागतो; नंतर (म्हणजे शरीरपातानंतर) तो (ब्रह्मरूप)प्राप्त करून घेतो." या वाक्यात अद्वितीय (अशा ब्रह्म या) वस्तूच्या ज्ञानाचे प्रयोजन त्या (ब्रह्मा) ची प्राप्ति असे श्रुतीने सांगितलेले आहे; ते प्रयोजन म्हणजेच फळ (हे लिंग) होय (२२).**

ब्रह्माचे / आत्म्याचे ज्ञान होण्यास गुरूचे / आचार्यांचे मार्गदर्शन शिष्याला आवश्यक आहे. शिष्याला झालेल्या आत्मज्ञानाचे फळ किंवा आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी केल्या जाणाऱ्या

श्रवण, मनन व निदिध्यासन यांच्या अनुष्ठानाचे फळ छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात असे सांगितले आहे :- ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे, तो पुरुष लगेच मरून जाऊन आत्मरूप /ब्रह्मरूप होत नाही.तर चालू जीवनातील प्रारब्ध कर्मांचा भोग संपेपर्यंत तो वर्तमानकालीन चालू देहात राहतो. त्यानंतर मरणोत्तर तो देहाच्या बंधनातून सुटल्यावर तो ब्रह्मरूप होऊन जातो. अशाप्रकारे ब्रह्मप्राप्ति म्हणजे ब्रह्मरूप होऊन जाणे हे फळ / प्रयोजन येथे सांगितलेले आहे.

* * *

अपूर्वता या लिंगाचा खुलासा पुढील २३व्या खंडामध्ये आहे.

(२३)

**अपूर्वता तु प्रकरणप्रतिपाद्यस्याद्वितीयवस्तुन: प्रमाणान्तराविषयीकरणम् । यथा तत्रैवाद्वितीयवस्तुनो मानान्तराविषयीकरणम् ।।२३।।**

**प्रकरणात प्रतिपादन केल्या जाणाऱ्या (ब्रह्म या) अद्‌वितीय वस्तूला (श्रुतीखेरीज) अन्य प्रमाणांचा विषय न करणे म्हणजे अपूर्वता (लिंग) होय. जसे :- तेथेच (म्हणजे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात ब्रह्म ही) अद्‌वितीय वस्तु दुसऱ्या कोणत्याही अन्य प्रमाणाचा विषय केलेली नाही (२३).**

प्रमाण म्हणजे ज्ञानाचे साधन. प्रत्यक्ष, अनुमान, इत्यादि ज्ञानाच्या प्राप्तीची प्रमाणे आहेत. मीमांसा व वेदान्त या दर्शनांच्या मते, ज्ञानप्राप्तीसाठी उपयोगी पडणाऱ्या प्रमाणांवरून जी गोष्ट कळून येत नाही, ती गोष्ट जे सांगते ते शास्त्र (अज्ञात - ज्ञापकं शास्त्रम्).म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि प्रमाणांच्या द्‌वारे ज्या विषयाचे ज्ञान होत नाही, त्या विषयाचे ज्ञान वेदशास्त्रावरून होते. आता, ब्रह्म /आत्मा ही वस्तु प्रत्यक्ष इत्यादि प्रमाणांनी कळणारी नाही. ब्रह्माचे ज्ञान फक्त वेद /श्रुति या प्रमाणानेच होऊ शकते. म्हणजेच ब्रह्माचे ज्ञान हे वेदाखेरीज अन्य कोणत्याही प्रमाणाने होणारे नाही; तसे ते न होणे म्हणजेच अपूर्वता लिंग होय. छांदोग्य उपनिषद् हे वेदाचाच एक भाग आहे. त्याच्या सहाव्या अध्यायामध्ये, ब्रह्माच्या ज्ञानासाठी अन्य प्रमाणांचा वापर केलेला नाही.

* * *

अर्थवाद या लिंगाचे विवरण खंड २४ मध्ये केलेले आहे.

(२४)

**प्रकरणप्रतिपाद्यस्य तत्र तत्र प्रशंसनम् अर्थवाद : । यथा अत्र उत तमादेशमप्राक्षी: येनाश्रुतं श्रुतं भवति अमतं मतं अविज्ञातं विज्ञातमिति अद्‌वितीय -वस्तु - प्रशंसनम् ।।२४।।**

**प्रकरणात प्रतिपादन करावयाच्या विषयाची तेथे तेथे (म्हणजे योग्य जागी) प्रशंसा करणे**

म्हणजे अर्थवाद (हे लिंग) होय. जसे :- येथे (म्हणजे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायामध्ये) "तू तुझ्या गुरूला त्या उपदेशाची पृच्छा केलीस का की ज्यामुळे जे ऐकलेले नाही ते ऐकले असे होते, ज्यामुळे ज्याचा विचार केला नाही त्याचा विचार केला असे होते, तसेच ज्यामुळे जे कळलेले नाही ते कळले असे होते." या ठिकाणी अद्‌वितीय (अशा ब्रह्म या) वस्तूची प्रशंसा / स्तुति आहे (म्हणजे अद्‌वितीय ब्रह्म वस्तूच्या ज्ञानाची प्रशंसा आहे) (२४).

तसे पाहिल्यास निंदा व स्तुति या दोहोंचाही अर्थवादात [१] समावेश होतो. तथापि प्रस्तुत स्थळी शंकराचार्यांनी अर्थवाद हा शब्द फक्त प्रशंसा किंवा स्तुति या अर्थाने घेतलेला आहे.

येथे उद्‌धृत केलेल्या अर्थवाद -वाक्याची पार्श्वभूमि अशी आहे :- आरुणीचा श्वेतकेतु या नावाचा पुत्र होता. पित्याच्या आज्ञेनुसार गुरुगृही राहून जेव्हा त्याने अध्ययन पुरे केले, तेव्हा त्या अध्ययनाचा अभिमानी होऊन तो परत आला. ते पाहून पित्याने त्याला विचारले, "ज्याचे योगाने परब्रह्म दर्शविले जाते, तो आदेश (=ज्ञान, तत्त्व) तू गुरूला विचारलास काय की ज्यामुळे अश्रुत गोष्टी श्रुत होतात, अतर्कित गोष्टी तर्कित होतात आणि अज्ञात गोष्टी ज्ञात होतात." 'न ऐकलेल्या गोष्टी ऐकल्या असे होते' इत्यादि म्हणण्याने ब्रह्मज्ञानाचे महत्त्व स्पष्ट होते. म्हणून हे वाक्य ब्रह्मज्ञानाची महती सांगणारे असल्याने, ते वाक्य प्रशंसा करणारे म्हणूनच अर्थवाद होते.

* * *

उपपत्ति या लिंगाचे विवेचन पुढील २५ व्या खंडात आहे.

## (२५)

**प्रकरणप्रतिपाद्यार्थसाधने तत्र श्रूयमाणा युक्तिरुपपत्तिः । यथा तत्र सौम्य एकेन मृत्पिण्डेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्याद् वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यं इत्यादौ अद्‌वितीयसाधने विकारस्य वाचारम्भणमात्रत्वे युक्तिः श्रूयते ॥२५॥**

प्रकरणात प्रतिपादन केल्या जाणाऱ्या विषयाच्या सिद्‌धीसाठी तेथे (म्हणजे त्या प्रकरणात) सांगितलेला युक्तिवाद म्हणजे उपपत्ति होय. जसे : तेथे (म्हणजे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात), "हे बाळा, एका मातीच्या गोळ्यावरून मातीपासून बनलेल्या सर्व वस्तू जाणल्या जातात; विकार किंवा कार्य म्हणजे वाचेवर आधारलेले केवळ नाव आहे; (मृन्मय पदार्थांचे कारण) मृत्तिका आहे आणि तीच सत्य आहे", अशा प्रकारच्या वाक्यांत अद्‌वितीय अशी (ब्रह्म ही) वस्तु सिद्‌ध करण्यासाठी, "विकार म्हणजे केवळ वाचेवर / शब्दांवर आधारलेले नाव आहे", अशाप्रकारचा तर्क श्रुतीने सांगितलेला आहे (२५).

---

१. प्राशस्त्यनिन्दान्यतरपरं वाक्यमर्थवादः । अर्थसंग्रह

## आत्मानात्मविवेक :

उपपत्ति म्हणजे युक्तिवाद; तर्क, अर्थापत्ति, अनुमान किंवा दृष्टांत / उदाहरण इत्यादींच्या आधारे केलेला युक्तिवाद. प्रतिपाद्य विषय हा तर्कांने सिद्‌ध करून दाखविला म्हणजे त्याला अधिक बळकटी येते आणि त्या विषयाला इतरांची मान्यता मिळू शकते.

छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात वापरलेली उपपत्ति अशी आहे :- श्वेतकेतु नावाच्या आपल्या मुलाला त्याचा पिता आरुणि ब्रह्मज्ञानाचा परिचय करून देत आहे. त्याच्या मते ब्रह्म / आत्मा हे विश्वाचे कारण आहे आणि हे कार्यरूप विश्व ब्रह्म या कारणापेक्षा भिन्न नाही. म्हणजे विश्व हे एक दुसरे स्वतंत्र तत्त्व नसून, ब्रह्म हेच एकमेव अद्‌वितीय तत्त्व आहे. या म्हणण्याला आधार म्हणून तो कार्यकारणाचा सिद्‌धांत सांगतो की कार्य हे तत्त्वत: कारणरूप असते, कार्य हे कारणापेक्षा तत्त्वत: भिन्न नसते. त्यासाठी तो माती व मातीपासून बनलेले पदार्थ या कार्यकारणाचे उदाहरण देतो. जसे :- एकाच मातीपासून हत्ती, घोडे, बोळकी, घडे, रांजण, इत्यादि मातीचे पदार्थ बनविले जातात. आता, वरवर पाहिल्यास, हे मातीचे पदार्थ भिन्न वाटतात; कारण त्यांना भिन्न भिन्न नावे दिली गेली आहेत. पण तत्त्व हे की मातीचे पदार्थ मातीच आहेत; ते माती या कारणस्वरूपातच आहेत; ते मातीपेक्षा भिन्न नाहीत. त्यामुळे कारणरूप अशी माती कळली की मातीची सर्व कार्ये - मातीपासून बनलेले पदार्थ - कळली असाच अर्थ होतो; कारण मातीची कार्ये मातीपेक्षा भिन्न नाहीत. मातीपासून बनलेली कार्ये त्यांच्या ज्या घडे, रांजण इत्यादि नावांमुळे वेगळी वाटतात, ती नांवे ही केवळ शब्दांवर आधारलेली आहेत. घडे, रांजण इत्यादि शब्द भिन्न आहेत; भिन्न शब्दांमुळे त्यांत फरक वाटला, तरी त्या वस्तू मातीपेक्षा भिन्न होत नाहीत. म्हणून असा निर्णय घेता येतो : मातीच्या वस्तूंत त्यांचे कारण असणारी माती तेवढीच सत्य आहे; मातीच्या कार्यांचे अस्तित्व हे माती-रूपच आहे; वस्तूंच्या भिन्न नावांनी त्यांतील मातीत फरक पडत नाही; ती माती एकच रहाते. याचप्रमाणे :- (अज्ञान ही उपाधि असणाऱ्या) ब्रह्मापासून[१] झालेल्या विश्वात जरी पदार्थांच्या भिन्न नावांमुळे त्यांत भेद दिसला, तरी तो भेद केवळ शब्दांवर आधारलेला आहे; त्या पदार्थांत त्यांचे कारण असणारे ब्रह्म तेवढेच सत्य आहे; त्यांचे अस्तित्व हे ब्रह्मरूपच आहे. म्हणजे सत्य असणारे ब्रह्म हे एकमेव अद्‌वितीय तत्त्वच रहाते. विश्व म्हणजे केवळ शब्दाचा प्रपंच /पसारा असल्याने, ब्रह्माचे एकमेव अद्‌वितीयत्व अबाधित रहाते. अशाप्रकारे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात ब्रह्माचे अद्‌वितीयत्व सिद्‌ध करण्यास उपपत्ति दिलेली आहे.

---

१. पुढे खंड ३७ खाली दिलेली अध्यारोपाची प्रक्रिया पहा. तेथे विश्वोत्पत्तीचा तपशील येतो.

येथे सहा लिंगांचे सोदाहरण स्पष्टीकरण संपले. या सहा लिंगांच्या द्वारा उपनिषदांना केवळ अद्वितीय ब्रह्मवस्तु सांगावयाची आहे, हे तात्पर्य कळून येते. आणि असे हे निश्चित ज्ञान होणे म्हणजेच श्रवण होय.

* * *

श्रवणाची चर्चा संपल्यानंतर, शंकराचार्य आता मनन या प्रक्रियेची माहिती पुढील खंड २६ मध्ये देत आहेत.

(२६)

**मननं तु श्रुतस्यादिव्तीयवस्तुनो वेदान्तार्थानुगुणयुक्तिभिरनवरतमनुचिन्तनम् ॥२६॥**

**आणि मनन म्हणजे श्रवणाने कळलेल्या (किंवा श्रुतीने सांगितलेल्या) (ब्रह्म या) अदिव्तीय वस्तूचे वेदान्ताला अनुकूल अशा तर्कांनी सतत चिंतन करीत रहाणे होय (२६).**

ब्रह्म / आत्मा हीच एकमेव अद्वितीय वस्तू आहे, असे निश्चित ज्ञान श्रवण या प्रक्रियेने झाले. आता त्याच ब्रह्माचे सतत चिंतन म्हणजेच मनन होय. आता मनन / विचार म्हटले की तेथे तर्क येणारच. पण वाटेल ते तर्क उपयोगी नाहीत. केवलाद्वैत वेदान्त शिकू इच्छिणाऱ्या अधिकारी पुरुषाने वाटेल ते तर्क करावयाचे नाहीत; तसे केल्यास तो केवळ तर्कटी होईल. तर जो तर्क श्रुतीला / वेदान्ताला प्रतिकूल नसून अनुकूल आहे, अशा तर्कांचा वापर करून सतत ब्रह्माचाच विचार करणे म्हणजे मनन होय. जो तर्क श्रुतीला विरोधी असतो, तो सैरावैरा पसरणारा, अनेकदा परस्पर-विरोधी आणि कदाचित् निर्णयाप्रत न नेणारा असू शकतो. अशा तर्कांनी पदरात काहीच पडणार नाही. म्हणून श्रुतीला अनुकूल नसणाऱ्या वांझोट्या तर्कांच्या जाळ्यात सापडू नये. त्याचा काही उपयोग होणार नाही. म्हणुन श्रुतीच्या वचनाला अनुकूल असेल असाच तर्क करावा.

असे मनन केल्याने काय होते ? श्रवणाच्या प्रक्रियेने निश्चितपणे कळलेल्या ज्ञानाचे दृढीकरण होते.

* * *

निदिध्यासन प्रक्रियेचे विवेचन खंड २७ मध्ये आहे.

(२७)

**विजातीय - देहादि-प्रत्यय-रहिताद् विजातीय - वस्तु-सजातीय-प्रत्यय-प्रवाहो निदिध्यासनम् । अस्यार्थः । विजातीय - देहादि-बुद्ध्यन्त- पदार्थ - निराकरणेन सजातीयाद्वितीय-वस्तु - विषय - प्रत्यय - प्रवाहीकरणं निदिध्यासनमित्यर्थः ॥२७॥**

**(आत्म्याशी)- विजातीय असणाऱ्या शरीर इत्यादींच्या ज्ञानाने रहित, (आणि शरीर**

**इत्यादीशी) विजातीय असणाऱ्या अशा (आत्म-) वस्तूच्या सजातीय ज्ञानाचा प्रवाह म्हणजे निदिध्यासन. या म्हणण्याचा अर्थ असा :- देहापासून ते बुद्धीपर्यंतचे (आत्म्याशी) विजातीय असणारे पदार्थ बाजूला सारून, अदिव्तीय अशा (आत्म-) वस्तूविषयीच्या सजातीय ज्ञानाचा प्रवाह सतत चालू ठेवणे म्हणजे निदिध्यासन, असा अर्थ आहे (२७).**

आत्मा / ब्रह्म ही एकमेव सच्चिदानंद अशी वस्तु आहे. आत्म्याखेरीजचे सर्व अन्य पदार्थ - देह, इंद्रिये, मन, बुद्धि इत्यादि सर्व - अचेतन व अनित्य असल्याने ते सर्व आत्म्याशी विजातीय ठरतात. श्रवण आणि मनन यांच्या दूवारे आता कळून आले आहे की देह इत्यादि विजातीय पदार्थांपेक्षा आत्मा हा सर्वस्वी भिन्न आहे. मुमुक्षूने आता आपले ज्ञान विजातीय पदार्थांपासून निवृत्त करून, ते फक्त आत्म्याशी निगडित करावयाचे आहे. आत्मविषयक ज्ञान हे एकाच आत्मा या विषयाबद्दल असल्याने ते सजातीय ज्ञान आहे. आत्मा या वस्तूचे सततचे सजातीय ज्ञान हे निरंतर /अखंड असणे म्हणजे त्या आत्म्याच्या सजातीय ज्ञानाचा सततचा अखंड प्रवाह असणे होय. त्यालाच निदिध्यासन म्हणतात. आत्म्याशी विजातीय असणारे देहापासून बुद्धीपर्यंतचे पदार्थ ज्ञानाचा विषय न करता, अद्वितीय अशा केवळ आत्मवस्तूच्या सजातीय ज्ञानाचे सततचे प्रवाहीकरण म्हणजे निदिध्यासन होय.

व्यवहारातही आपण म्हणतो :- अमक्याला तमक्या गोष्टीचा ध्यास लागला आहे. म्हणजे त्या माणसाला त्या गोष्टीखेरीज अन्य काही सुचत नाही; तो सतत त्याच गोष्टीचा विचार करीत रहातो. परमार्थात आत्म्याखेरीज अन्य कशाचे भान नसणे, आत्म्याचा सतत ध्यास असणे म्हणजेच निदिध्यासन.

येथे शमाचे स्पष्टीकरण संपले.

* * *

शमादि-षट्कातील शमानंतरचा जो दम, त्याचे विवेचन आता शंकराचार्य पुढील खंड २८ मध्ये करतात.

(२८)

**दमो नाम बाह्येन्द्रियनिग्रहः। बाह्येन्द्रियाणि कानि । कर्मेन्द्रियाणि पंच ज्ञानेन्द्रियाणि पंच । तेषां निग्रह : श्रवणादिव्यतिरिक्त -विषयेभ्यो निवृत्तिर्दम : ॥२८॥**

**दम म्हणजे बाह्य इंद्रियांचा निग्रह. (प्रश्नः-) बाह्य इंद्रिये कोणती ? (उत्तर :-) पाच कर्मेंद्रिये आणि पाच ज्ञानेंद्रिये ( या दहा इंद्रियांना बाह्य इंद्रिये म्हणतात). त्यांचा निग्रह म्हणजे श्रवण इत्यादि सोडून उरलेल्या विषयांतून त्यांची निवृत्ति म्हणजे दम होय (२८).**

शरीराच्या अपेक्षेने बाहेर दिसणारी आणि बाह्य विषयांशी संबधित होणारी ती बाह्य इंद्रिये. ही दहा आहेत. ती अशी :- डोळा, कान, नाक, जीभ व त्वचा ही पाच ज्ञानेंद्रिये आहेत ; ती शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पाच बाह्य विषयांचे ज्ञान करून घेण्यास उपयोगी पडणारी आहेत. हात, पाय, वाचा, पायु (=गुद), आणि उपस्थ (=जननेंद्रिय) अशी ही पाच कर्मेंद्रिये आहेत. देणे-घेणे, चालणे, बोलणे, मलोत्सर्ग करणे इत्यादि कर्मे ही इंद्रिये करतात. या सर्वच इंद्रियांचा संबध बाह्य विषयांशी येतो. ते सर्व - शब्द, स्पर्श, इत्यादि - बाह्य विषय हे अनात्मा आहेत; ते आत्म्यापेक्षा वेगळे आहेत. तथापि इंद्रियांच्या द्‌वारा मन हे बाह्य विषयांकडे धावत असते. श्रवण इत्यादीकडे मन लागावयाचे असल्यास, ते इंद्रियामार्फत बाह्य विषयांकडे जाता कामा नये. त्यासाठी या इंद्रियांचा निग्रह / संयम करणे आवश्यक आहे. बाह्य इंद्रियांना विषयांकडे जाऊ न देणे किंवा ती गेल्यास त्यांना माघारी वळवणे, हे काम झाले तर मन हे श्रवण, मनन, इत्यादीकडे वळेल. म्हणून येथे बाह्य इंद्रियांचा निग्रह म्हणजे "श्रवण, मनन, इत्यादि सोडून उरलेल्या विषयांतून निवृत्ति" असे गौणपणे म्हटले आहे.

* * *

उपरतीचे वर्णन पुढील २९ व्या खंडात आहे.

(२९)

**उपरतिर्नाम विहितानां कर्मणां विधिना परित्यागः । श्रवणादिष्वेव वर्तमानस्य मनसः श्रवणादौ वर्तमानत्वं वा उपरतिः ॥२९॥**

**शास्त्राने विहित केलेल्या कर्मांचा (शास्त्रोक्त) विधीने त्याग म्हणजे उपरति. अथवा :- श्रवण इत्यादीमध्ये लागलेल्या मनाचे (त्याच) श्रवण इत्यादीमध्ये गुंतून रहाणे म्हणजे उपरति होय (२९).**

येथे उपरतीची दोन स्पष्टीकरणे शंकराचार्यांनी दिलेली आहेत.

(१) उपरतीचे पहिले स्पष्टीकरण :- संध्यावंदन यांसारखी नित्यकर्मे, आणि जातेष्टि (=जातकर्म; अपत्याचा जन्म झाल्यावर केली जाणारी इष्टि) यांसारखी नैमित्तिक / प्रासंगिक कर्मे शास्त्राने विहित केली आहेत म्हणजे करावीत असे सांगितले आहे. आता, आळस इत्यादि कारणांनी जर ही कर्मे केली नाहीत, तर पाप लागते. तथापि जर शास्त्रोक्त विधीने संन्यास घेऊन, या कर्मांचा त्याग केला तर प्रत्यवाय येत नाही व ती कर्मे न करण्याने पापही लागत नाही. संन्यास

घेऊन, कर्मत्याग करण्याचा शास्त्रोक्त विधि मनुस्मृति पुढीलप्रमाणे सांगते: " ज्या यज्ञात सर्वस्वाची दक्षिणा दिली आहे असा प्राजापत्य नावाचा यज्ञ करून, स्वत:मध्येच अग्नीची स्थापना करून, ब्राह्मणाने घरातून बाहेर पडून संन्यास [१] घ्यावा". संन्यासी नित्यनैमित्तिक कर्मांचा त्याग करू शकतो. असा त्याग म्हणजे उपरति. जुन्याकाळी आत्मज्ञानासाठी संन्यास आवश्यक मानला जाई. कारण संन्यास आश्रमात अन्य कसलेच व्यावहारिक व्यवधान नसल्याने, श्रवण इत्यादींवर लक्ष केंद्रीभूत करणे सुलभ होई.

(२) उपरतीचे दुसरे स्पष्टीकरण :- शम या गुणाला अनुसरून श्रवण इत्यादीमध्ये मन लागलेले आहेच; ते तेथे तसेच टिकवून धरणे म्हणजे उपरति. भावार्थ असा:- श्रवण इत्यादीकडे मन लावण्यास प्रयत्न करावा लागतो. पण हे मन म्हणजे चंचळ ओढाळ गुरु असल्याने, ते श्रवण इत्यादींचा त्याग करून पुन: विषयांकडे धावण्याची शक्यता असते. तेव्हा तसे होऊ न देता, श्रवण इत्यादीत लागलेले मन तसेच तेथे स्थिर ठेवणे, त्याला तेथून ढळू न देणे, श्रवण इत्यादीतच मनाचे एकाग्रीकरण टिकवून धरणे म्हणजे उपरति.

* * *

तितिक्षा म्हणजे काय हे खंड ३० मध्ये सांगितले आहे.

(३०)

**तितिक्षा नाम देह -विच्छेद-व्यतिरिक्तं शीतोष्णादि-द्वंद्व- सहनम् ।**

**निग्रहशक्तावपि परापराधसोढृत्वं वा तितिक्षा ।।३०।।**

**तितिक्षा म्हणजे देहाचा नाश सोडून, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वे सहन करणे. किंवा :- (=आपणांस त्रास /दु:ख देणाऱ्या माणसांचा) निग्रह करण्याची शक्ति असूनसुद्धा, दुसऱ्याचे अपराध सहन करत रहाणे म्हणजे तितिक्षा (३०).**

येथे शंकराचार्यांनी तितिक्षा या गुणाची दोन स्पष्टीकरणे दिली आहेत.

(१) तितिक्षेचे पहिले स्पष्टीकरण :- परमार्थसाधनाने आत्मसाक्षात्कार करून घेण्यास जिवंत देह आवश्यक आहे. दु:ख आहे, ते सहन होत नाही म्हणून देहनाशाकडे प्रवृत्ति करू नये. हे जग द्वंद्वात्मक आहे म्हणजे ते परस्परविरुद्ध गोष्टींनी भरलेले आहे. जसे :- शीत -उष्ण,लाभ-

---

१.प्राजापत्यं निरुप्येष्टिं सर्व - वेदस - दक्षिणम् । आत्मन्यग्नीन् समारोप्य ब्राह्मणो प्रव्रजेद् गृहात् ।। (मनुस्मृति, ६.३८). प्राय: पहिले तीन म्हणजे ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य व वानप्रस्थ हे तीन आश्रम झाल्यावर संन्यास घ्यावा, अशी अपेक्षा पूर्वकाळी होती. आता संन्यास घेण्यास वैराग्य आवश्यक आहे. म्हणून वैराग्य येताच लगेच संन्यास घेण्यास हरकत नाही (यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्) असेही काहीजण म्हणत.

हानि, मान-अपमान, शत्रु-मित्र, निंदा-स्तुति, इत्यादि. त्यांतील आपणांस अनुकूल असणाऱ्या गोष्टी सुखकर असतात, तर प्रतिकूल गोष्टी दुःखदायक होतात. या दवंद्वामुळे मनाची चलबिचल होते, मन एकाग्र होऊ शकत नाही. म्हणून मनाचा समतोल राखून ही द्वंद्वे सहन करण्यास शिकावे लागते. ही द्वंद्वे सहन करणे म्हणजे त्यांच्यामुळे मनाची चलबिचल होऊ न देणे; सर्व परिस्थितीत मनाचा समतोल सांभाळून त्यांचा मनावर परिणाम होऊ न देणे हे महत्त्वाचे आहे. ते होण्यासाठी असा विचार करावा:- इंद्रिये आणि विषय यांच्या संपर्काअंती ही द्वंद्वे येत असतात; ती येणारी व जाणारी आहेत म्हणजेच अनित्य आहेत; त्यांचा आत्म्याशी काडीइतकाही संबंध नाही. या विचाराची दृढता झाली की द्वंद्वे सहन करता येतात. प्रतिकार न करता व मनाची समतोल स्थिति ढळू न देता, ही द्वंद्वे सहन करणे म्हणजे तितिक्षा.

(२) तितिक्षेचे दुसरे स्पष्टीकरण :- या जगात वावरताना पुष्कळदा असे घडते की इतर माणसे आपले वाईट करतात, आपल्यावर अन्याय करतात, आपले अपराध करतात, व आपल्याला त्रास देतात. समजा, त्यांना अद्दल घडविण्याची, त्यांना धडा शिकवण्याची, त्यांचा बदला घेण्याची, त्यांना शिक्षा करण्याची शक्ति आपल्याजवळ आहे. तथापि त्यांना शिक्षा न करता त्यांनी केलेले अपराध सहन करीत रहाणे म्हणजे तितिक्षा. तितिक्षा म्हणजे क्षमाशील व सहनशील वृत्ति. यावरून असे समजावयास हवे असे वाटते : प्रतिकार करू न शकणारा माणूस मनात दुःखीकष्टी होत जर दुसऱ्याने केलेले अपराध नाईलाजाने सहन करीत असेल तर तेथे तितिक्षा होणार नाही.

* * *

समाधान या गुणाचे विवेचन पुढील ३१ व्या खंडात आहे.

## (३१)

**समाधानं नाम श्रवणादिषु वर्तमानं मनो वासनावशाद् विषयेषु यदा यदा गच्छति तदा दोषदृष्ट्या तेषु तेषु श्रवणादिषु समाधिः समाधानम् ॥३१॥**

**समाधान म्हणजे :- श्रवण, इत्यादीमध्ये गुंतलेले मन (समजा) वासनेला वश होऊन, जेव्हा जेव्हा विषयाकडे वळेल, तेव्हा तेव्हा (विषय व त्यांचे भोग यांमध्ये फार) दोष आहेत ही दृष्टि बाळगून, (ते मन पुनः पुनः) त्या श्रवण इत्यादीमध्ये एकाग्र करणे म्हणजे समाधान होय (३१).**

शम या गुणाच्या प्राप्तीमुळे मन श्रवण, मनन व निदिध्यासन यांत गुंतू लागले आहे. तथापि मनातील विषयाविषयीच्या वासना अद्यापि संपलेल्या नाहीत. त्या वासना मनावर प्रभाव पाडू शकतात आणि त्यामुळे मन पुनः बाह्य विषयांकडे वळू लागते. तसे पाहिल्यास मन हे

बहिर्मुखच आहे. त्यामुळे वासनेचे बळ / प्रेरणा मिळताच ते श्रवण इत्यादींना सोडून विषयांकडे जाऊ लागते. अशा वेळी मनाला विषयांपासून परावृत्त करून, त्याला पुन: श्रवण इत्यादीमध्ये गुंतवावे लागते. विषयांपासून मनाला परावृत्त करताना, त्याला विषयांचे दोष समजावून सांगावे लागतात, ते असे :- " विषय हे अनित्य आहेत. त्यांच्यावर आपला ताबा नाही; त्यामुळे आपणांस पाहिजे तेव्हा पाहिजे तो विषय मिळेल असे नाही. विषयापासून मिळणारे सुख हे तत्कालिक आहे; कारण विषय हे अनित्य आहेत. तसेच एकच विषय कायम सुखदायक होईल असे नाही. तेव्हा अशा विषयांच्या मागे लागण्यात काही अर्थ नाही." अशाप्रकारच्या विचारांनी मनाची समजूत घालून, मनाला विषयांतून विन्मुख करून, त्याला पुन: श्रवण इत्यादीमध्ये एकाग्र करावे. अशाप्रकारे श्रवण, मनन, इत्यादीमध्ये केलेले मनाचे एकाग्रीकरण म्हणजे समाधान होय.

* * *

श्रद्धा म्हणजे काय हे पुढील ३२ व्या खंडात सांगितले आहे.

(३२)

**श्रद्धा नाम गुरु-वेदान्त-वाक्येषु अतीव विश्वास: ।**
**इदं तावत् शमादिषट्कमित्युक्तम् ।।३२।।**

**गुरूची वचने आणि वेदान्तातील-उपनिषदांतील - वाक्ये यांवर आत्यंतिक विश्वास म्हणजे श्रद्धा. (मागील १६ व्या खंडापासून येथपर्यंत सांगितलेले) हे (सर्व) म्हणजे शम इत्यादि सहा गोष्टींचा समूह होय असे म्हटले जाते (३२).**

आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी आचार्य / गुरु हा आवश्यक आहे. तो गुरु उपनिषदातील वाक्यांचा अर्थ सांगेल. तसेच तो स्वानुभवाने अन्य काही गोष्टीही सांगेल. या स्थितीत गुरु-वचन हे प्रमाण म्हणून स्वीकारावयास हवे. तसेच आत्मा / ब्रह्म इत्यादीविषयी उपनिषदे जे सांगतात ते खरे आहे, असा विश्वास हवा. कारण असा विश्वास नसेल तर गुरु व उपनिषदे जे सांगतात त्याप्रमाणे आचरण होऊन आत्मप्राप्ति होण्याची शक्यता दुरावेल. आणि हा विश्वास डळमळीत असून चालणार नाही; हा विंश्वास आत्यंतिक पाहिजे.

भगवद्गीतेनेही सांगितले आहे की श्रद्धा असणाऱ्यालाच ज्ञान [१] प्राप्त होते. अशी श्रद्धा अथवा विश्वास नसेल अणि गुरु व वेदान्त यांचेविषयी मनात संशयाचे पिशाच्च थैमान घालीत असेल, तर ' संशयी मन असणाऱ्या माणसाचा [२] नाश होतो ' या भगवद्गीतेच्या वचनानुसार

१. श्रद्धावान् लभते ज्ञानम् । भ.गी. ४.३९

२. संशयात्मा विनश्यति । भ.गी ४.४०

आपल्याला काही लाभ न होता हानीच पत्करावी लागेल. म्हणून संशय सोडून देऊन, गुरु व उपनिषदे यांच्या वाक्यांवर दृढ विश्वास ठेवला पाहिजे. असा दृढ विश्वास म्हणजे श्रद्धा.

खंड १६ पासून येथपर्यंत शम, इत्यादि सहा गोष्टींचे स्पष्टीकरण झाले. या सहा गोष्टींना शमादि-षट्क (म्हणजे शम इत्यादि सहा गोष्टींचा समुदाय) असे म्हटले जाते.

* * *

आता मुमुक्षुत्व या चौथ्या साधनाचे विवेचन खंड ३३ मध्ये दिले आहे.

(३३)

**मुमुक्षुत्वं नाम मोक्षे अतितीव्रेच्छावत्त्वम् ।।३३।।**

**मुमुक्षुत्व म्हणजे मोक्षाच्या बाबतीत अतिशय तीव्र इच्छा असणे होय (३३).**

मुमुक्षु म्हणजे सुटण्याची इच्छा करणारा पुरुष. ही सुटका संसारातून व्हावयाची अशी अपेक्षा आहे. संसार म्हणजे जन्ममरणाचे चक्र. जन्ममरण हे कर्मांमुळे आहे. तेव्हा मुमुक्षु म्हणजे संसारातून म्हणजेच जन्ममरणाच्या चक्रातून म्हणजेच कर्मांच्या बंधनातून मुक्त होण्याची इच्छा करणारा पुरुष. जर एकादूयाला संसारच आवडत असेल, जर त्याला संसारात सोसाव्या लागणाऱ्या लाथा-बुक्क्या गोड वाटत असतील तर त्याला संसारातून सुटण्याची इच्छा होणार तरी कशी? तेव्हा ज्याला खरोखरच संसारातील दुःखातून / तापातून / त्रासातून सुटण्याची इच्छा असेल, तोच आत्मानात्मविवेकाकडे वळेल, हे उघड आहे. काही वेळा स्मशान - वैराग्याप्रमाणे संसाराचा उबग येऊन, "पुरे हा संसार" अशी इच्छा प्रासंगिकपणे काही काळापुरती येऊ शकते. पण तशी प्रासंगिक इच्छा उपयोगी नाही. म्हणून संसाराच्या जंजाळातून कायमची सुटका / मुक्तता व्हावी अशी तीव्र इच्छा ज्याला आहे, तोच मुमुक्षु होय.

* * *

येथपर्यंत साधनचतुष्टय सांगून झाले. ते ज्याच्याजवळ आहे, तोच आत्मानात्मविवेक करण्यास पात्र / अधिकारी आहे असे पुढील ३४ व्या खंडात सांगितले आहे.

(३४)

**एतत्साधनचतुष्टयसंपत्तिः, तद्वान् साधनचतुष्टयसंपन्नः। तस्य आत्मानात्मविचारे अधिकारः। यथा ब्रह्मचारिणः कर्तव्यान्तरं नास्ति तथास्यान्यत् कर्तव्यं नास्ति ।।३४।।**

**चार साधनांच्या समूहाचा हा उत्कर्ष आहे. तो ज्याच्याजवळ आहे तो पुरुष साधन - चतुष्टय-संपन्न असणारा होतो. त्याला आत्मा आणि अनात्मा यांच्याविषयीचा विचार करण्याच्या बाबतीत अधिकार / पात्रता आहे. (तसेच) ज्याप्रमाणे ब्रह्मचारी बटूला अन्य**

**कर्तव्य नसते, त्याप्रमाणे या (साधनचतुष्टयाने युक्त असणाऱ्या ) माणसाला अन्य कर्तव्य असत नाही (३४).**

साधन-चतुष्टयाने युक्त असणारा पुरुषच आत्मानात्मविवेकाचा अधिकारी आहे, असे मागे खंड १३ मध्ये सांगितले होते. त्याचा पुनरुच्चार येथे आहे. आणखी, त्याच्या कर्तव्याचा उल्लेख येथे अधिक आहे.

पूर्वकाळी ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांतील माणसांसाठी ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे चार आश्रम होते. ब्रह्मचर्य-आश्रमात वेद,इत्यादींचे अध्ययन करणे व त्यासाठी आवश्यक ते नियम पाळणे, हे ब्रह्मचारी बटूचे कर्तव्य असे. त्याला अन्य काही कर्तव्य नसे. त्या बटूप्रमाणेच साधन-चतुष्टयाने युक्त असणारा पुरुष आत्मानात्म-विचाराकडे वळला की त्याला एकच कर्तव्य असे; ते म्हणजे आत्मानात्मविचारासाठी आणि आत्म्याच्या साक्षात्कारासाठी जे जे आवश्यक कर्तव्य असेल ते करीत रहाणे.

साधन-चतुष्टयाने युक्त असणाऱ्या पुरुषाने ब्रह्मवेत्त्या / ब्रह्मसाक्षात्कारी गुरूकडे जाऊन त्याचे मार्गदर्शन घ्यावयास हवे, असे जरी येथे स्पष्टपणे म्हटले नसले तरी "आचार्यवान् पुरुषो वेद" या मागे उद्धृत केलेल्या श्रुतिवचनावरून आणि 'श्रद्धा' या गुणाच्या स्पष्टीकरणावरून कळून येणारे आहे. तेव्हा या अधिकारी पुरुषाने योग्य त्या गुरूचे मुखातून आत्मानात्मविवेक समजून घेणे आवश्यक ठरते.

* * *

आत्मानात्म-विचार हा प्रायः संन्याश्यासाठी आहे. तेव्हा तो गृहस्थासाठी नाही काय असा प्रश्न आल्यास, त्याचे उत्तर पुढील खंड ३५ मध्ये आहे.

(३५)

**साधन -चतुष्टय -संपत्त्यभावेऽपि गृहस्थानामात्मविचारे क्रियमाणे सति तेन प्रत्यवायो नास्ति, किंतु अतीव श्रेयो भवति । यथा दिने दिने च वेदान्तविचाराद् भक्तिसंयुतात् । गुरुशुश्रूषया लब्धात् कृच्छ्राशीति -फलं भवेत्, इत्युक्तम् ।।३५।।**

**साधन -चतुष्टय संपत्तीचा अभाव असतानाही, गृहस्थाश्रमात असणाऱ्या पुरुषांनी आत्म्याचा विचार केला, तरी त्यामुळे काही अडचण (किंवा पाप) निर्माण होणार नाही. उलट अतिशय श्रेय / कल्याण प्राप्त होते. उदाहरणार्थ :- (या संदर्भात) असे म्हटले आहे :- गुरूच्या सेवेने प्राप्त झालेल्या, भक्तियुक्त होऊन केलेल्या, दैनंदिन अशा वेदान्त -विचारामुळे माणसाला ऐंशी कृच्छ्रांचे फळ मिळेल (३५).**

साधन -चतुष्टय -संपत्ति ही आत्मानात्मविचाराला आवश्यक आहे. त्यापैकी चारही

साधने प्रामुख्याने संन्यास घेतलेल्या माणसाच्या ठिकाणी संभवतात हे खरे. तथापि नित्यानित्यवस्तुविवेक आणि मुमुक्षुत्व ही दोन साधने इतर आश्रमांत असणाऱ्या माणसाजवळ असण्याची शक्यता आहे. या स्थितीत प्रश्न असा :- गृहस्थाश्रमी माणसाने आत्मा व अनात्मा यांचा विचार करूच नये काय? तसे केल्यास, त्याच्या जीवनात काही अडचणी येतील काय व त्याला पाप लागेल काय ? या प्रश्नाचे उत्तर असे :- तसे होणार नाही. उलट आत्मविषयक विचार केल्यास त्याचे कल्याण होईल ( हीच गोष्ट थोड्याफार फरकाने ब्रह्मचारी आणि वानप्रस्थाश्रमी यांना लागू पडेल). या म्हणण्याला आधार म्हणून एक श्लोक शंकराचार्यांनी उद्धृत केला आहे. त्या श्लोकानुसार, गुरुसेवापूर्वक, श्रद्धेने, वेदान्ताने सांगितलेल्या आत्मा इत्यादींचा विचार दररोज केल्याने फायदाच आहे; तोटा मात्र मुळीच नाही. या फायद्यासाठी 'कृच्छ्र'चे उदाहरण दिले आहे. कृछ्र हे एकप्रकारचे प्रायश्चित्त आहे. हिंदूंच्या धर्मशास्त्रात अनेक प्रायश्चित्ते सांगितली आहेत. कळत किंवा नकळत घडलेल्या पापांचे / दोषांचे परीमार्जन हे प्रायश्चित्तांचे प्रयोजन आहे. तेव्हा प्रायश्चित्ताने पाप वा दोष यांचे परिमार्जन होऊन शुद्धि लाभते; त्याप्रमाणे आत्मानात्मविचाराने गृहस्थाश्रमी पुरुषांच्या चित्ताची शुद्धि होईल. चित्तशुद्धि ही अध्यात्मात / परमार्थात अति आवश्यक म्हणून मानली जाते.

* * *

(३६)

**आत्मानात्मविचार: कर्तव्य इत्युक्तम् ॥३६॥**

**आत्मा आणि अनात्मा यांचा विचार करावा असे (मागे) म्हटले होते (३६)**

मागे खंड १३ मध्ये आत्मा व अनात्मा याविषयी विचार करावा असे म्हटले होते, त्याची आठवण येथे करून देऊन, त्या आत्मा व अनात्मा यांच्या स्वरूपाचा निर्देश पुढील ३७-३८ या खंडांत केला आहे.

* * *

आत्म्याचे निरूपण खंड ३७ मध्ये आहे.

(३७)

**आत्मा नाम स्थूल-सूक्ष्म-कारण-शरीर-त्रय-विलक्षण: पंचकोष-व्यतिरिक्त: अवस्था-त्रय-साक्षी सच्चिदानंदस्वरूप: ॥३७॥**

**आत्मा म्हणजे स्थूळ, सूक्ष्म आणि 'कारण' (ही नावे असणाऱ्या) तीन शरीरांच्या समुदायापेक्षा वेगळे स्वरूप असणारा, पाच कोषांपेक्षा निराळा, तीन अवस्थांचा साक्षी असणारा, आणि सत्-चित्-आनंद हे स्वरूप असणारा असा (नित्य पदार्थ म्हणजे आत्मा) आहे (३७).**

### आत्मानात्मविवेक :

आत्मा हे अंतिम, नित्य, सत्य तत्त्व आहे. तो एकमेव अद्‌वितीय आहे. त्याच्या जोडीने अन्य कोणतेही अंतिम सत् तत्त्व नाही. त्यालाच ब्रह्म असेही म्हणतात. हा आत्मा सत् / सत्य म्हणजे तीनही काळांत असणारा, नित्य व अविकारी आहे. तो चित् म्हणजे चैतन्य / ज्ञान, चिद्रूप आहे. तो शुद्‌ध आनंदस्वरूप आहे. आत्मा हा नित्य, शुद्‌ध, बुद्‌ध आणि मुक्त असा आहे.

हा आत्मा स्थूल, सूक्ष्म व " कारण " या तीन शरीरांपेक्षा वेगळा आहे. या तीन शरीरांचे स्पष्टीकरण अनुक्रमे खंड ३९,४४ आणि ५५ यांमध्ये आहे.

हा आत्मा पाच कोषांपेक्षा[१] अगदी निराळा आहे. हे पाच कोश [१] असे : (१) अन्नमय (२) प्राणमय (३) मनोमय (४) विज्ञानमय व (५) आनंदमय. या पाच कोषांचे विवरण खंड ६० मध्ये आहे.

हा आत्मा तीन अवस्थांचा साक्षी / द्रष्टा आहे. या तीन अवस्था पुढील प्रमाणे :- (१) जागृति (२) स्वप्न आणि (३) सुषुप्ति. त्यांचे अधिक विवेचन पुढे खंड ५८ मध्ये दिलेले आहे. या खंडात तीन शरीरे, पाच कोष, आणि तीन अवस्था यांचा उल्लेख आलेला आहे. त्यांचे केवलाद्‌वैत तत्त्वज्ञानात काय स्थान आहे याचा बोध होण्यास ज्या काही अन्य गोष्टी लक्षात घ्याव्या लागतात, त्या आता येथे सांगितल्या आहेत.

### अध्यारोप आणि अपवाद :-

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाकडे पारमार्थिक व व्यावहारिक दृष्टिकोनातून पहावे लागते, असे प्रस्तावनेत सांगितले होते. त्यांचाच अधिक उलगडा करण्यास गुरु शिष्याला अध्यारोप [२] व अपवाद या प्रक्रियांचा परिचय करुन देतात. आणि जीव व ब्रह्म एकच कसे हे तत्त्वमसि वाक्याचा सम्यक् अर्थ सांगून पटवून देतात.

अध्यारोप सांगताना, ब्रह्मावर / आत्म्यावर विश्व हे अध्यारोपित / अध्यस्त आहे असे सांगितले जाते, तर अपवादात, अध्यस्त असणारे विश्व हे मिथ्या असल्याने, एकमेव एक असे एक ब्रह्म हेच तत्त्व आहे, असे सांगितले जाते. जसे:- अंधुक प्रकाशात जमिनीवर पडलेली दोरी (रज्जु) ही साप (सर्प) वाटते. तेथे साप नसणाऱ्या रज्जूवर सर्पाचा आरोप [३] / अध्यास झाला. असाच प्रकार ब्रह्माचे बाबतीत होतो. ब्रह्माला वस्तु असे म्हटले जाते. ब्रह्माखेरीज जो अज्ञान इत्यादि जड / अचेतन तत्त्वांचा समूह आहे त्याला अवस्तु [४] म्हणतात. आता ब्रह्म ही वस्तु

---

१. कोष हा शब्द कोश असाही लिहिला जातो.

२. अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपंचं प्रपंच्यते । अध्यारोप व अपवाद यांच्या द्‌वारा निष्प्रपंच / प्रपंचातीत ब्रह्माचे स्पष्टीकरण केले जाते.

३. अध्यासो नाम अतस्मिन् तद्‌बुद्‌धि: । शंकराचार्यांचे ब्र. सू. वरील अध्यासभाष्य.

४. वस्तु सच्चिदानंद -अनंत- अद्‌वयं ब्रह्म । अज्ञान-आदि-सकल-जड-समूह: अवस्तु । वेदान्तसार

खरे म्हणजे अवस्तु नाही. तथापि अवस्तु नसणाऱ्या ब्रह्म या वस्तूवर अवस्तूचा आरोप केला जातो; या आरोपालाच अध्यारोप / अध्यास [१] असे म्हणतात.

रज्जूवर जो सर्प भासतो, त्याला रज्जूचा विवर्त असे म्हणतात. रज्जूचा विवर्त असणारा सर्प हा रज्जूवर स्वतंत्रपणाने अस्तित्वात नाही; तेथे तो रज्जुरूपच आहे. बरोबर त्याचप्रमाणे वस्तूवर / ब्रह्मावर विवर्तरूपाने भासणारा जो अज्ञान इत्यादींचा प्रपंच म्हणजे विस्तार आहे, तोही तेथे ब्रह्मावर स्वतंत्ररूपाने नाही; तो वस्तुरूप / ब्रह्मरूप आहे, असे सांगणे म्हणजे अपवाद [२] होय.

**अध्यारोपाची प्रक्रिया :-**

ब्रह्मावर जगाचा अध्यारोप होताना, काही विशिष्ट पद्धतीने व क्रमाने बह्मावर जग भासू लागते असे सांगितले जाते; त्या पद्धतीला अध्यारोपाची प्रक्रिया असे म्हणता येते. अध्यारोपाची ही प्रक्रिया सदानंदकृत वेदान्तसार या ग्रंथावरून पुढीलप्रमाणे सांगता येते.

(१) अज्ञानाची उपाधि :- प्रथम ब्रह्माला अज्ञानाची उपाधि [३] येते. हे अज्ञान सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनी [४] बनलेले आहे. या अज्ञानाकडे व्यष्टि व समाष्टि या दोन दृष्टिकोनातून पहाता येते. व्यष्टि ही अनेक असते, तर समूहरूपाने असणारी समाष्टि एक असते. जसे :- अनेक वृक्षांनी वन बनते. वनातील प्रत्येक वृक्ष ही व्यष्टि आहे; ते वृक्ष अनेक आहेत. तर अनेक वृक्षांचा समुदाय असणारे वन हे समष्टि असून ते एक आहे.

अज्ञान- समष्टि ही विशुद्ध अशा सत्त्वगुण हा प्रधान असणारी अशी असते. ही अज्ञान-समष्टि ब्रह्माला / शुद्ध चैतन्याला उपाधि म्हणून आली की त्या चैतन्याला ईश्वर असे नाव दिले जाते. आणि हा ईश्वर सर्वज्ञ, सर्वेश्वर, अंतर्यामी आणि जगाचे कारण होतो. आणि या ईश्वराची उपाधि असणारी जी अज्ञानसमष्टि आहे, तिला कारण-शरीर, आनंदमयकोश, सुषुप्ति आणि स्थूल -सूक्ष्म-प्रपंच-लय-स्थान असे म्हटले जाते.

---

१. असर्पभूतायां रज्जौ सर्पारोपवद् वस्तुनि अवस्त्वारोप: अध्यारोप: । (वेदान्तसार); वस्तुन्यवस्त्वारोपो य: सोऽध्यारोप इतीर्यते । असर्पभूते रज्ज्वादौ सर्पत्वारोपणं यथा ।। (शंकराचार्य कृत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, २९७)

२. अपवादो नाम रज्जुविवर्तस्य सर्पस्य रज्जुमात्रत्ववद्, वस्तुविवर्तस्य अवस्तुन: अज्ञानादे: प्रपंचस्य वस्तुमात्रत्वम् ( वेदान्तसार); विवर्तस्यास्य जगत: सन्मात्रत्वेन दर्शनम् । अपवाद इति प्राहुरद्वैत-ब्रह्म-दर्शिन: ।। (सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, ६२० )

३. उपाधि म्हणजे ती गोष्ट की जिच्यामुळे दुसऱ्या एकाद्या वस्तूला मर्यादा पडली असे वाटते अथवा दुसऱ्या वस्तूचे स्वरूप बदलले असे वाटते. उदा. घटामुळे आकाश हे मर्यादित होऊन लहान असे घटाकाश झाले असे वाटते; म्हणून येथे घट ही आकाशाची उपाधि होते. तसेच, पांढऱ्या शुभ्र स्फटिकाजवळ लाल रंगाचे फूल ठेवले की तो स्फटिक लाल रंगाचा आहे असे भासू लागते; म्हणून येथे लाल फूल ही स्फटिकाची उपाधि होय. ब्रह्माला येणाऱ्या अज्ञान या उपाधीने या दोन्हीही गोष्टी घडतात.

४. आत्मानात्मविवेक, खंड ९ पहा.

## आत्मानात्मविवेक:

अज्ञान-व्यष्टि ही मलिन-सत्त्व-गुण-प्रधान असणारी अशी असते. ही अज्ञानव्यष्टि शुद्ध चैतन्याला / ब्रह्माला उपाधि म्हणून आली की त्या चैतन्याला प्राज्ञ ही संज्ञा दिली जाते. हा प्राज्ञ अल्पज्ञ, अनीश्वर, इत्यादि असतो. आणि या प्राज्ञची जी उपाधि अज्ञान-व्यष्टि आहे, तिला कारण-शरीर, आनंदमयकोश, सुषुप्ति व स्थूल -सूक्ष्म-शरीर-प्रपंच-लय-स्थान असे म्हटले जाते.

(२) अज्ञानाच्या दोन शक्ति :- अज्ञानाजवळ (१) आवरण शक्ति, आणि (२) विक्षेप शक्ति अशा दोन शक्ति आहेत. [१] अज्ञान हे स्वत:च्या आवरणशक्तीने झाकून टाकलेल्या ब्रह्मावर / आत्म्यावर विक्षेपशक्तीने आकाश [२] इत्यादी प्रपंच /विश्व निर्माण करते.म्हणजे असे:-दोन शक्तींनी युक्त असणऱ्या अज्ञानाची उपाधि असणारे चैतन्य (ईश्वर) हे स्वत:च्या प्राधान्याने प्रपंचाचे निमित्त कारण बनते, आणि स्वत:च्या अज्ञान या उपाधीच्या प्राधान्याने ते प्रपंचाचे [३] उपादान कारण बनते. तमोगुण [४] प्रधान असणारे विक्षेपशक्तीने युक्त असे अज्ञान ही उपाधि असणाऱ्या चैतन्यापासून आकाश, आकाशातून वायु, वायूपासून तेज, तेजामधून जल आणि जलापासून पृथ्वी या क्रमाने आकाश इत्यादि पाच सूक्ष्म भूते उत्पन्न होतात. अज्ञानाचे सत्त्व आणि रज हे गुण तमोगुण-प्रधान अज्ञानात कमी प्रमाणात का होईना असतातच. आणि अज्ञानाचे सत्त्व, रज व तम हे तीनही गुण आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांत [५] उतरतात.म्हणजे चैतन्याच्या अधिष्ठानावर तम:प्रधान अज्ञानातून आकाश इत्यादि पाच सूक्ष्म भूते निर्माण होतात. याच आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांना / सूक्ष्म भूते, तन्मात्र अथवा अपंचीकृत भूते [६] असे म्हणतात. ही भूते इंद्रियांना ग्राह्य नसल्याने, ती सूक्ष्म आहेत. यावेळी या पाच भूतांचे परस्पर मिश्रण झालेले नसते; ती भूते फक्त आपापल्या रूपात (तत् + मात्र=तन्मात्र) असतात. म्हणजे आकाशात फक्त आकाश, वायूमध्ये फक्त वायु, तेजात फक्त तेज, जलात फक्त जल आणि पृथ्वीमध्ये फक्त पृथ्वी असते. पुढे पंचीकरण पद्धतीने या आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांचे परस्पर मिश्रण होते; परंतु ही भूते सूक्ष्म स्थितीत असताना त्यांच्यात पंचीकरणाने होणारे परस्पर मिश्रण नसते; म्हणून त्यांना अपंचीकृत (ज्यांच्यात पंचीकरण झालेले नाही अशी) भूते असे म्हणतात. या आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांपासून एका बाजूने सूक्ष्म शरीरे आणि दुसऱ्या बाजूने पंचीकरणाने बनणारी स्थूल पंच महाभूते उत्पन्न होतात.

---

१. अज्ञानस्य आवरण -विक्षेप-नामकं अस्ति शक्तिद्वयम्। वेदान्तसार

२. विक्षेपशक्तिर्लिंगादि ब्रह्माण्डान्तं जगत् सृजेत्। (शंकराचार्यकृत वाक्यसुधा, १३)(लिंगापासून ब्रह्मांडापर्यंत सर्व जग विक्षेप शक्ति निर्माण करते)

३. शक्ति-द्वयवदज्ञानोपहितं चैतन्यं स्वप्रधानतया निमित्तं, स्व-उपाधि -प्रधानतया उपादानं च भवति। (वेदान्तसार)

४. जेव्हा तम हा गुण अज्ञानामध्ये सत्त्व आणि रज या गुणापेक्षा अधिक / वरचढ होतो, तेव्हा तम:प्रधान अज्ञान होते.

५. तदानीं सत्त्वरजस्तमांसि कारण -गुण-प्रक्रमेण तेषु आकाशादिषु उत्पद्यन्ते। (वेदान्तसार). आकाश इत्यादि सूक्ष्म-भूतांच्या उत्पत्तीच्या वेळी त्यांचे कारण असणाऱ्या गुणक्रमानुसार आकाश इत्यादीमध्ये सत्त्व, रज, व तम हे तीन गुण उत्पन्न होतात.

६.एतान्येव सूक्ष्मभूतानि तन्मात्राणि अपंचीकृतानि च उच्यन्ते ।(वेदान्तसार)

(३) सूक्ष्म शरीरांची उत्पत्ति :- आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांतील सत्त्व गुणाच्या अंशापासून श्रोत्र, त्वचा, डोळा, जीभ व नाक ही पाच ज्ञानेंद्रिये उद्‌भूत होतात, ती अशी :- आकाशाच्या सत्त्वांशापासून श्रोत्र, वायूतील सत्त्वांशापासून त्वचा, तेजाच्या सत्त्वांशापासून डोळा, जलातील सत्त्वांशापासून जीभ, आणि पृथ्वीच्या सत्त्वांशापासून [१] नाक उत्पन्न होते. ज्ञानेंद्रियांच्या निर्मितीत सूक्ष्म भूतांच्या सात्त्विक अंशाचे परस्पर मिश्रण झालेले नसते. श्रोत्र, इत्यादि पाच ज्ञानेंद्रिये ही शब्द, स्पर्श,रूप, रस व गंध या पाच बाह्य विषयांच्या ज्ञानाची साधने असल्याने त्यांना ज्ञानेंद्रिये म्हणतात.

आकाश इत्यादि सूक्ष्म भूतातील रजोगुणाच्या अंशापासून हात, पाय, वाचा, गुद व शिश्न ही पाच कर्मेंद्रिये अशी निर्माण होतात :- आकाशाच्या रजोगुणाच्या अंशातून वाचा, वायूतील रजोगुणाच्या अंशापासून हात, तेजाच्या रज-अंशापासून पाय, जलाच्या रजोगुण-अंशातून गुद, आणि पृथ्वीतील रजोगुणाच्या अंशापासून [२] उपस्थ निर्माण होते. कर्मेंद्रियांच्या उत्पत्तीमध्ये आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांच्या रजोगुणाच्या अंशांचे परस्पर-मिश्रण झालेले नसते.

प्राण, अपान, उदान, समान आणि व्यान हे पाच प्राण आकाश इत्यादीतील रजोगुणाच्या अंशांच्या परस्पर मिश्रणाने बनतात. [३]

मन आणि बुद्‌धि [४] हे पाच सूक्ष्म भूतांच्या सत्त्व-गुणाच्या अंशांच्या [५] परस्पर मिश्रणाने बनतात.

आता, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच प्राण, मन आणि बुद्‌धि मिळून सतरा घटक होतात. या सतरा घटकांनी / अवयवांनी सूक्ष्म [६] शरीर बनलेले असते.

पाच प्राण व पाच कर्मेंद्रियें यांच्या समूहाला प्राणमय कोश [७] म्हणतात. पाच ज्ञानेंद्रिये व मन यांच्या समुदायाला मनोमय कोश [८] म्हंटले जाते. आणि पाच ज्ञानेंद्रिये व बुद्‌धि मिळून विज्ञानमय [९] कोश होतो. येथे विज्ञान म्हणजे बुद्‌धि असा अर्थ आहे. म्हणजे सूक्ष्म शरीरात प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय असे तीन कोश असतात.

---

१. एतानि (ज्ञानेंद्रियाणि) आकाशादीनां सात्त्विकांशेभ्यः व्यस्तेभ्यः पृथक् पृथक् क्रमेण उत्पद्यन्ते। (वेदान्तसार)
२. एतानि (-कर्मेंद्रियाणि) पुनराकाशादीनां रजोंऽशेभ्योव्यस्तेभ्यः पृथक् पृथक् क्रमेण उत्पद्यन्ते। (वेदान्तसार)
३. एतत् प्राणादि -पंचकं आकाशादि-गत-रजोंऽशेभ्यो मिलितेभ्यः उत्पद्यते । (वेदान्तसार)
४. संकल्प विकल्प करते ते मन; निश्चय करते ती बुद्‌धि.
५. एते (बुद्‌धिमनसी) पुनराकाशादिगत - सात्त्विकांशेभ्यो मिलितेभ्यः उत्पद्यन्ते । (वेदान्तसार)
६. सूक्ष्म-शरीराणि सप्तदशावयवानि लिंगशरीराणि।अवयवास्तु ज्ञानेंद्रियपंचकं बुद्‌धिमनसी कर्मेंद्रियपंचकं वायुपंचकं च इति । (वेदान्तसार)
७. इदं प्राणादिपंचकं कर्मेन्द्रियैः सहितं सत् प्राणमयकोशो भवति। (वेदान्तसार)
८. मनस्तु ज्ञानेंद्रियैः सहितं सत् मनोमयकोशो भवति। (वेदान्तसार)
९. इयं बुद्‌धिः ज्ञानेंद्रियैः सहिता विज्ञानमयकोशो भवति (वेदान्तसार)

या सूक्ष्म शरीरांची उपाधिही शुद्ध चैतन्याला येते. सूक्ष्म-शरीर-समष्टि ही उपाधि असणाऱ्या चैतन्याला हिरण्यगर्भ किंवा सूत्रात्मा असे म्हणतात. तर सूक्ष्म -शरीर-व्यष्टि ही उपाधि असणाऱ्या चैतन्याला तैजस असे नाव दिले जाते.

४) स्थूल अशा पंच महाभूतांची उत्पत्ति :- आकाश इत्यादि पाच सूक्ष्म भूतांपासून दुसऱ्या बाजूने पंचीकरण -प्रक्रियेद्वारा [१] पाच स्थूल अशी महाभूते उत्पन्न होतात. या पाच महाभूतांना आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी हीच नावे असणारी पंचीकृत (पंचीकरणाने बनलेली) भूते असे म्हणतात.

या पाच महाभूतापासून सर्व ब्रह्मांडे, त्यांतील जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशी चार प्रकारची स्थूल शरीरे व त्या शरीरांच्या वाढीला योग्य असे अन्न, पाणी इत्यादि उत्पन्न होतात. स्थूल शरीरालाच अन्नमय कोश असे म्हटले जाते.

या स्थूल शरीरांची उपाधिही शुद्ध चैतन्याला येते. स्थूल-शरीर-समष्टि ही उपाधि असणाऱ्या चैतन्याला विराट् / वैश्वानर असे म्हणतात, तर स्थूल-शरीर-व्यष्टि ही उपाधि असणाऱ्या चैतन्याला विश्व हे नाव दिले जाते.

तीन शरीरांच्या समाष्टि आणि व्यष्टि या उपाधी चैतन्याला येत असल्याने, त्याला जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्था येतात.

व्यष्टि आणि समष्टि शरीरांच्या उपाधींनी चैतन्याला दिली जाणारी नावे, कोश, आणि अवस्था हे कोष्टकाद्वारे पुढीलप्रमाणे सांगता येतात :-

(अ) समष्टि -दृष्टिकोन

| **शरीर-उपाधी** | **कोश** | **अवस्था** | **चैतन्याला दिलेले नाव** |
|---|---|---|---|
| कारण | आनंदमय | सुषुप्ति | ईश्वर |
| सूक्ष्म | प्राणमय<br>मनोमय<br>विज्ञानमय | स्वप्न | हिरण्यगर्भ / सूत्रात्मा |
| स्थूल | अन्नमय | जागृति | विराट् / वैश्वानर |

१. पंचीकरणप्रक्रियेची माहिती आत्मानात्मविवेक, खंड ४१ मध्ये येते.

(आ) व्यष्टि - दृष्टिकोन

| शरीर-उपाधी | कोश | अवस्था | चैतन्याला दिलेले नाव |
|---|---|---|---|
| कारण | आनंदमय | सुषुप्ति | प्राज्ञ |
| सूक्ष्म | प्राणमय<br>मनोमय<br>विज्ञानमय | स्वप्न | तैजस |
| स्थूल | अन्नमय | जागृति | विश्व |

अशा प्रकारे शुद्ध चैतन्यावर / ब्रह्मावर व्यष्टि व समष्टि शरीरांचा आरोप करणे, ही अध्यारोपाची सामान्य [१] कल्पना झाली.

अध्यारोपाच्या विशिष्ट संकल्पनेचा [२] खुलासा खंड ७६ खाली, अपवादाचे विवरण खंड ५४ खाली, आणि तत्त्वमसि या वाक्याचे स्पष्टीकरण खंड ७७ खाली केलेले आहे.

* * *

अनात्मा म्हणजे काय हे पुढील खंड ३८ मध्ये सांगितले आहे.

(३८)

**अनात्मा नाम अनृत-जड-दु:खात्मकं समष्टि-व्यष्ट्यात्मक-शरीर-त्रयम् ।**
**शरीर -त्रयं नाम स्थूल-सूक्ष्म-कारण-शरीर -त्रयम् ॥३८॥**

**अनात्मा म्हणजे :- अनृत / मिथ्या, जड/अचेतन, आणि दु:ख हे स्वरूप असणारे, आणि समष्टि व व्यष्टि या स्वरूपात असणारे शरीर-त्रय होय. शरीर-त्रय म्हणजे स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन शरीरांचा समुदाय होय (३८).**

मागे पाहिल्याप्रमाणे आत्मा हा एकमेव अद्विवतीय सत्य तत्त्व आहे. साहजिकच आत्म्याखेरीज अन्य काही आहे असे जे भासते/वाटते ते सर्व अनात्मा (=आत्मा नसणारे) आहे. आत्मा हा सत्य / सत् , चित् / चेतन, व सुख / आनंद हे स्वरूप असणारा आहे. अनात्मा बरोबर याच्या उलट म्हणजे अनृत /मिथ्या, जड/अचेतन आणि दु:ख हे स्वरूप असणारा आहे.

आत्म्याखेरीज जे काही अन्य भासते ते अनात्मा. या अनात्म्यालाच शरीरत्रय असे म्हटले आहे. 'कारण' (=अज्ञान), सूक्ष्म व स्थूल अशी तीन शरीरे आहेत. त्यांच्या व्यष्टि-समष्टीचा खुलासा वर खंड ३७ खाली झाला आहे.

---

१. एवं वस्तुनि अवस्त्वारोप: अध्यारोप: सामान्येन प्रदर्शित: । (वेदान्तसार)
२. अंतरात्म्यावर जे स्त्री, पुत्र, इत्यादि बाह्य पदार्थांचे विशिष्ट आरोप केले जातात, त्यांनाच विशिष्ट अध्यारोप म्हटले जाते.

**आत्मानात्मविवेक:**

या खंडात आलेल्या काही शब्दांचे स्पष्टीकरण पुढे येणाऱ्या खंडांत दिलेले आहे. 'अनृत-जड-दुखात्मक' याचे अधिक विवेचन खंड ५६ मध्ये आहे. व्यष्टि व समष्टि दृष्टिकोनांचा खुलासा खंड ५७ व ७३ मध्ये येतो. स्थूल शरीराचे विवरण खंड ३९ मध्ये, सूक्ष्म शरीराचे विवरण खंड ४४ मध्ये, आणि कारण शरीराचे स्पष्टीकरण खंड ५५ मध्ये आहे.

* * *

अनात्मा असणाऱ्या स्थूल शरीराचे विवरण खंड ३९ मध्ये असे आहे.

(३९)

**स्थूल-शरीरं नाम पंचीकृत-भूत-कार्यं कर्म-जन्यं जन्मादिषड्विकारम् ॥३९॥**

**स्थूल शरीर हे पंचीकृत भूतांचे कार्य असणारे, कर्मांनी निर्माण होणारे, आणि जन्म इत्यादि सहा विकारांनी युक्त असणारे असे आहे (३९).**

स्थूल शरीर म्हणजे इंद्रियांनी ग्राह्य असणारे शरीर होय. ते पंचीकृत भूतांपासून बनते; म्हणून त्याला पंचीकृत-भूत-कार्य म्हटले आहे. आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांमध्ये पंचीकरण घडल्यावर जी स्थूल अशी आकाश इत्यादि पंच महाभूते बनतात त्यांना पंचीकृत भूते असे म्हणतात. या स्थूल, पंचीकृत, आकाश इत्यादि महाभूतांपासून स्थूल शरीर बनलेले असते. म्हणून स्थूल शरीर हे पंचीकृत भूतांचे कार्य होय असे म्हटलेले आहे.

ज्या पंचीकरण प्रक्रियेने आकाश इत्यादि सूक्ष्म भूतांपासून पंचीकृत भूते निर्माण होतात, त्या पंचीकरण प्रक्रियेचे स्पष्टीकरण खंड ४१ मध्ये आहे.

मागे खंड ४ मध्ये पाहिल्याप्रमाणे शरीरधारण हे कर्मांमुळे असते. कर्मांमुळेच पुन: पुन: स्थूल शरीराची उत्पत्ति होत असते. म्हणून स्थूल शरीर हे कर्मजन्य आहे असे येथे म्हटलेले आहे.

स्थूल शरीराला जन्म इत्यादि सहा विकार होतात. या जगात जो जो पदार्थ निर्माण होतो तो तो विकारी म्हणजे सातत्याने बदल पावणारा असतो. हे बदल / विकार सहा आहेत. यास्क नावाच्या आचार्याने हे सहा विकार पुढीलप्रमाणे सांगितले आहेत :- (१) जायते (जन्म) (२)अस्ति (अस्तित्व) (३) वर्धते (वाढ) (४) विपरिणमते (फेरबदल) (५) अपक्षीयते (ऱ्हास, अपक्षय) (६) नश्यति (नाश). हे सहाही विकार स्थूल शरीराच्या बाबतीत पुढीलप्रमाणे घडतात :- (१) गर्भावस्थेत स्थूल शरीराचा प्रारंभ होतो (जायते) (२) गर्भावस्थेतून स्थूल शरीर बाह्य जगात अस्तित्वात येते (अस्ति) (३) मग त्याची वाढ होते (वर्धते) (४) त्यानंतर त्यात फेरबदल होत राहतात (विपरिणमते) (५) नंतर त्याचा ऱ्हास / अपक्षय होऊ लागतो (अपक्षीयते) (६) आणि शेवटी एकदिवस स्थूल शरीर नष्ट होऊन जाते (नश्यति).

अशा प्रकारे :- स्थूल शरीर हे पंचीकृत अशा आकाश, इत्यादि महाभूतांचे कार्य आहे; ते कर्मांच्या प्रभावाने निर्माण होत असते; आणि त्याला जन्म इत्यादि सहा विकारांनी ग्रासलेले असते.

* * *

स्थूल शरीराच्या वर्णनाला आधार म्हणून शंकराचार्य ... खंड ४० मध्ये एक श्लोक उद्धृत करतात.

(४०)

**तथा चोक्तम् - पंचीकृत-महाभूत-संभवं कर्मसंचितम् । शरीरं सुखदु:खानां भोगायतनमुच्यते, इति ।।४०।।**

**आणि (स्थूल शरीराबाबत) असे म्हटलेले आहे, "पंचीकृत महाभूतांपासून उत्पन्न होणारे, कर्मांमुळे निर्माण होणारे, असे (स्थूल) शरीर हे सुखदु:खाच्या भोगांचे आश्रयस्थान असते ", असे म्हटले जाते (४०).**

स्थूल शरीर हे पंचीकृत भूतांपासून बनते व ते कर्मसंचित म्हणजे कर्मांच्या प्रभावाखाली सिद्ध होत असते, हे वर खंड ३९ खाली पाहून झाले आहे. मागे खंड ३ मध्ये पाहिल्याप्रमाणे, स्थूल शरीर आहे तोपर्यंत सुखदु:खांचा भोग भोगावाच लागतो. म्हणून स्थूल शरीराला भोगांचे आयतन म्हणजे आधारस्थान असे म्हटले आहे.

* * *

ज्या पंचीकरण प्रक्रियेने पाच सूक्ष्म भूतांचे परस्पर मिश्रण होऊन पाच स्थूल महाभूते बनतात, ते पंचीकरण पुढील खंड ४१ मध्ये विवेचिले आहे.

(४१)

**पंचीकरणं तु :- द्विधा विधाय चैकैकं चतुर्धा प्रथमं पुन: । स्व-स्वेतर-द्वितीयांशैर्योजनात् पंच पंच ते, इति ।।४१।।**

**आणि पंचीकरण म्हणजे - एकेका (सूक्ष्म) भूताचे (प्रथम) दोन (समान अर्धे) भाग करून, त्यांतील पहिल्या (अर्ध्या) भागाचे पुन: चार (समान) भाग करून, (मग) प्रत्येकाच्या स्वत:च्या अर्ध्या भागाशी आपल्याखेरीज उरलेल्या इतर भूतांच्या दुसऱ्या अर्ध्या भागाच्या केलेल्या (एकेक) चतुर्थ भागाशी जोडल्याने, ती पाच (पंचीकृत महाभूते) होतात (४१).**

पंचीकरण ही केवलाद्वैत वेदान्तातील एक महत्त्वाची प्रक्रिया आहे. आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी ही पाच सूक्ष्म भूते कोणत्या पद्धतीने एकमेकांत मिसळतात, हे सांगण्याचे काम पंचीकरण करते. पंचीकरणाने बनलेल्या प्रत्येक स्थूल अशा महाभूतात पाचही भूतांचे अंश असतात. प्रत्येक पंचीकृत भूतात इतर भूतांचे अंश काय पद्धतीने येतात, हे पंचीकरण प्रक्रिया स्पष्ट करते. ही पंचीकरणाची पद्धत अशी आहे.

## आत्मानात्मविवेक:

(अ) आकाश, वायु, तेज,जल व पृथ्वी यांतील प्रत्येक सूक्ष्म भूत हे एक एकक (म्हणजे एक) आहे असे मानावयाचे.

(आ) मग प्रत्येक सूक्ष्म भूताचे प्रथम दोन समान अर्धे भाग करावयाचे.जसे : आकाश-१= १/२ आकाश + १/२ आकाश; वायु-१ = १/२ वायु + १/२ वायु; तेज-१ = १/२ तेज + १/२ तेज; जल-१ = १/२ जल + १/२ जल; आणि पृथ्वी -१ = १/२ पृथ्वी + १/२ पृथ्वी.

(इ) नंतर प्रत्येक सूक्ष्म भूताच्या पहिल्या अर्ध्या भागाचे चार समान भाग करावयाचे म्हणजे १/२ ला ४ ने भागले की १/८ भाग होतो. त्यानुसार असे होते:-

१/२ आकाश = १/८ आकाश + १/८ आकाश + १/८ आकाश + १/८ आकाश
१/२ वायु = १/८ वायु + १/८ वायु + १/८ वायु + १/८ वायु
१/२ तेज = १/८ तेज + १/८ तेज+ १/८तेज + १/८ तेज
१/२ जल = १/८ जल + १/८ जल + १/८ जल + १/८जल
१/२ पृथ्वी = १/८ पृथ्वी + १/८ पृथ्वी + १/८ पृथ्वी + १/८ पृथ्वी

(ई) यानंतर प्रत्येक सूक्ष्म भूताचा उरलेला १/२ भाग हा स्वत:ला सोडून इतर चार भूतांच्या प्रत्येक १/८ भागाशी जोडून द्यावयाचा. असे केले की एकेक पंचीकृत भूत होते. म्हणजे असे :-

१/२ आकाश + १/८ वायु + १/८ तेज + १/८ जल + १/८ पृथ्वी = पंचीकृत आकाश -१
१/२ वायु + १/८ आकाश + १/८ तेज + १/८ जल + १/८ पृथ्वी = पंचीकृत वायु -१
१/२ तेज + १/८ आकाश + १/८ वायु + १/८ जल + १/८ पृथ्वी = पंचीकृत तेज -१
१/२ जल + १/८ आकाश + १/८ वायु + १/८ तेज + १/८ पृथ्वी = पंचीकृत जल -१
१/२ पृथ्वी + १/८ आकाश + १/८ वायु + १/८ तेज + १/८ जल = पंचीकृत पृथ्वी -१

(उ) पंचीकरणाने बनलेल्या पंचीकृत भूताला स्थूल भूत किंवा महाभूत म्हणतात.

(ऊ) प्रत्येक पंचीकृत भूतात पाचही भूतांचे अंश असतात. तरी एकाद्या पंचीकृत भूतात ज्या भूताचे अंश जास्त असतात, त्या भूताचे नाव त्या पंचीकृत भूताला दिले जाते. जसे :- वरील पंचीकृत आकाश -१ मध्ये आकाशाचे १/२ अंश हे इतर भूतांच्या अंशापेक्षा जास्त आहेत. म्हणून त्याला पंचीकृत आकाश असे नाव दिले आहे. याचप्रमाणे पंचीकृत वायु, इत्यादि अन्य भूतांचे बाबतीत समजावे.

* * *

स्थूल शरीर म्हणजे पंचीकृत भूतांचे कार्य असे खंड ३९ मध्ये म्हटले होते. शरीरालाच

देह असेही म्हणतात. या शरीर व देह शब्दांचे व्युत्पत्तीने कळणारे अर्थ शंकराचार्य पुढील खंड ४२ मध्ये सांगतात.

(४२)

शीर्यते वयोभिर्बाल्य-कौमार-यौवन-वार्धक्यादिभि: इति शरीरम्। दह भस्मीकरणे इति व्युत्पत्त्या च देह: भस्मीभावं प्राप्नोति। ननु केचिद् देहा न भस्मीभावं प्राप्नुवन्ति, केचिद् देहा: खननादि प्राप्नुवन्ति, कथमुच्यते सर्वं स्थूलादिकं स्थूलदेहजातं भस्मीभावं प्राप्नोति। यद्यप्येवं, तथापि केनाग्निना दाहत्वं संभवति इत्यत आह । सर्वेषां स्थूलदेहानां आध्यात्मिकाधिभौतिकाधिदैविकादि-ताप-त्रयाग्निना दाहत्वं संभवति ॥४२॥

बालपण, कौमार अवस्था, तारुण्य, वार्धक्य इत्यादि वयाच्या अवस्थांनी जे शीर्ण केले जाते ते शरीर होय. दह् म्हणजे भस्मीभूत होणे / जळून जाणे / दग्ध होणे, या अर्थाच्या दह् धातूवरून साधलेल्या देह या शब्दाच्या व्युत्पत्तीनुसार, (जो) भस्मीभूत अवस्थेप्रत जातो (तो देह असे म्हणता येते). (शंका:-) काही देह हे भस्मीभूत अवस्थेप्रत जात नाहीत; काही देह खणलेल्या जमिनीत पुरलेल्या अवस्थेत जातात. तेव्हा सर्व स्थूल देह भस्मीभावाप्रत जातात, असे कसे बरे म्हटले आहे ? अशा स्थितीत (सर्व स्थूल देहांच्या बाबतीत) कोणत्या अग्नीच्या द्वारा (देहाची) दाहक्रिया संभवते? (या शंकेचे समाधान करणारे) उत्तर ग्रंथकार (असे) देतो :- आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक या ताप-त्रय-रूपी अग्नीने सर्व स्थूल देहांच्या संदर्भात दहनक्रिया संभवते (४२).

शरीर हा शब्द 'शृ' (=ठार मारणे, फाडणे) या धातूपासून साधलेला आहे. मग वयाबरोबर ज्यात फेरबदल होतात, ज्याला इजा पोचविली जाते, जे तुटते/फुटते, जे क्षीण होत जाते, व जे शेवटी नष्ट होऊन जाते, ते शरीर असे म्हणता येते.

शरीर शब्दाला समानार्थी ' देह ' शब्द आहे. देह हा शब्द दह् (=दग्ध होऊन जाणे, भस्मीभूत होणे) या धातूपासून साधलेला आहे. तेव्हा जो जळून जातो, भस्मीभूत होतो, तो देह असा देह शब्दाचा अर्थ व्युत्पत्तीवरून होतो. आता जी स्थूल मृत शरीरे / मढी जाळली जातात, त्यांच्या बाबतीत हा व्युत्पत्त्यर्थ शब्दश: / वाच्यार्थाने खरा आहे. परंतु काही मृत देह पुरले जातात किंवा दहनाखेरीज अन्य तऱ्हेने त्यांची विल्हेवाट लावली जाते. अशा देहांच्या बाबतीत वरील व्युत्पत्त्यर्थ वाच्यार्थाने / मुख्यार्थाने लागू पडत नाही, हे उघड आहे. मग त्यांना देह कसे म्हणता येईल ? या प्रश्नाचे उत्तर असे :- असल्या देहांच्या बाबतीत जळून जाण्याची क्रिया ही मुख्यार्थाने न घेता गौण किंवा लाक्षणिक अर्थाने घ्यावयाची आहे. म्हणजे असे :- लाक्षणिक अर्थाने पाहिल्यास, स्थूल देह हा वेगळ्या पद्धतीने जळत असतोच. सर्व स्थूल देहांच्या बाबतीत, त्रिविध दु:ख होत

असते. दु:ख [१] हा एक प्रकारचा अग्निच आहे. म्हणून दु:ख-संतप्त, दु:खदग्ध असे शब्दप्रयोग केले जातात. आणि दु:खरूपी अग्नीने देह जळत असतोच. आता दु:ख हे जरी मानसिक असले तरी त्याचा परिणाम स्थूल देहावर होतच असतो. म्हणून दु:खरूपी अग्नीने स्थूल देह जळत असतो, असे गौणपणाने म्हणता येते. त्रिविध दु:खांनाच त्रिविध ताप असे म्हटले जाते. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक असे त्रिविध ताप/दु:खे स्थूल देहाला जाळत असतात.

* * *

ज्या त्रिविध तापांनी स्थूल देह जळत असतो, त्यांचा खुलासा पुढील खंड ४३ मध्ये आहे.

(४३)

**आध्यात्मिकं नाम आत्मानं देहं अधिकृत्य वर्तते इति अध्यात्मम् । अध्यात्मं च तत् दु:खं आध्यात्मिकं वात-पित्त-कफ-जात-शिरोरोग-ज्वरादिना व्याधिरूपम् । आधिभौतिकं नाम भूतमधिकृत्य वर्तते इति आधिभौतिकं व्याघ्र-तस्करादि-जन्यदु:खम् ।आधिदैविकं नाम देवमधिकृत्य वर्तते इति आधिदैविकं शीतातप-वात-वर्ष-वैद्युतादि-दु:खम् ।।४३।।**

आध्यात्मिक दु:ख म्हणजे आत्म्याच्या [२] म्हणजे देहाच्या बाबतीत जे असते, ते अध्यात्म; आणि असे अध्यात्म (देहाशी संबंधित असणारे) ते दु:ख म्हणजे आध्यात्मिक दु:ख होय; ते वात, कफ , पित्त यांच्या (असमतोला) पासून निर्माण होणारे असून, ते मस्तकाचे रोग, ताप, इत्यादि प्रकारांनी व्याधि -रूप म्हणजे रोगरूप असणारे असते. आधिभौतिक म्हणजे भूतांच्या संबंधामुळे असते ते; वाघ, चोर, इत्यादि (भूतां)पासून उत्पन्न होणारे दु:ख म्हणजे आधिभौतिक दु:ख होय. आधिदैविक म्हणजे देवांच्या संबंधामुळे येते ते म्हणजे थंडी, ऊन, वादळ-वारा, पाऊस, वीज इत्यादि (पासून निर्माण होणारे) दु:ख होय (४३).

भारतीय आयुर्वेदशास्त्रानुसार, कफ, वात व पित्त यांचा समतोल शरीरात असल्यास शरीराचे आरोग्य रहाते; हा समतोल बिघडला तर रोग होतात. हे रोग शरीराला त्रास देतात. शारीरिक रोगाअंती होणारे दु:ख म्हणजे आध्यात्मिक दु:ख होय. मस्तकशूल, पोटशूल, निरनिराळे ज्वर इत्यादीपासून होणारे दु:ख हेही आध्यात्मिक दु:ख होय. शारीरिक व्याधिरूप दु:ख म्हणजे आध्यात्मिक दु:ख होय.

---

१. दु:खाने आलेले अश्रु हे गरम/कढत असतात, असे व्यवहारात म्हटले जाते. ते अश्रु दु:खरूपी अग्नीने तापविलेले असतात.

२. संस्कृत भाषेत आत्मा शब्दाला अनेक अर्थ आहेत. आध्यात्मिक शब्दात आत्मा म्हणजे शरीर असा अर्थ येथे घेतला आहे.

या जगात नाना प्रकारचे प्राणी / भूते आहेत. उदा. चोर, वाघ, साप, इत्यादि. या भूतांपासून होणारे दु:ख म्हणजे आधिभौतिक दु:ख होय.

पर्जन्य, वायु, इत्यादि देवतारूप मानले गेले आहेत. देवतारूप मानल्या गेलेल्या गोष्टींपासून होणारे दु:ख म्हणजे आधिदैविक दु:ख होय. उदा. कडक ऊन, अति थंडी, अतिवृष्टी, प्रचंड वादळ, विद्युत्पात, इत्यादीमुळे होणारे दु:ख हे आधिदैविक दु:ख होय.

* * *

सूक्ष्म शरीराची माहिती आता खंड ४४ मध्ये दिली आहे.

(४४)

**सूक्ष्मशरीरं नाम अपंचीकृत -भूत-कार्यं सप्तदशकं लिंगम्। सप्तदशकं नाम ज्ञानेन्द्रियाणि पंच कर्मेन्द्रियाणि पंच प्राणादि-वायवः पंच बुद्धिर्मनश्चेति ।।४४।**

**सूक्ष्मशरीर म्हणजे अपंचीकृत (अशा आकाश इत्यादि सूक्ष्म) भूतांचे कार्य असणारे आणि सतरा (घटकां)च्या समूहाने युक्त असणारे लिंग शरीर होय. सतरा (घटकां)चा समूह म्हणजे पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, प्राण इत्यादि पाच वायु, बुद्धि तसेच मन (यांचा समूह होय) (४४).**

खंड ३७ खाली पाहिल्याप्रमाणे, चैतन्याच्या अधिष्ठानावर तमःप्रधान अज्ञानातून आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी ही सूक्ष्म, अपंचीकृत भूते उत्पन्न होतात, आणि त्यांचेपासून एका बाजूने पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच प्राण, मन आणि बुद्धि निर्माण होतात, आणि या सतरा घटकांच्या समूहाने सूक्ष्म शरीर बनते. या सूक्ष्म शरीरालाच ' लिंग' असेही म्हणतात. या लिंग शब्दाचे स्पष्टीकरण पुढे खंड ५४ मध्ये दिले आहे.

* * *

सूक्ष्म शरीराचे घटक असणाऱ्या पाच ज्ञानेंद्रियांची तपशीलवार माहिती पुढील खंड ४५ मध्ये येते.

(४५)

**ज्ञानेन्द्रियाणि कानि। श्रोत्र -त्वक् -चक्षुर्जिह्वा-घ्राणानि। श्रोत्रेन्द्रियं नाम कर्ण-व्यतिरिक्तं कर्ण-शष्कुल्यवच्छिन्न- नभोदेशाश्रयं शब्द -ग्रहण-शक्तिमद् इन्द्रियं श्रोत्रेन्द्रियमिति। त्वगिन्द्रियं नाम त्वग्-व्यतिरिक्तं त्वगाश्रयं आपादतलमस्तक-व्यापि शीतोष्णादि-स्पर्श-ग्रहण-शक्तिमद् इन्द्रियं त्वगिन्द्रियमिति। चक्षुरिन्द्रियं नाम गोलोक-व्यतिरिक्तं गोलोकाश्रयं कृष्णतारकाग्रवर्ति रूपादि-ग्रहण-शक्तिमद् इन्द्रियं चक्षुरिन्द्रियमिति ।जिह्वेन्द्रियं नाम जिह्वा-व्यतिरिक्तं जिह्वाश्रयं जिह्वाग्रवर्ति रसादि-**

ग्रहण-शक्तिमद् इन्द्रियं जिह्वेन्द्रियमिति ।घ्राणेन्द्रियं नाम नासिका-व्यतिरिक्तं नासिकाश्रयं नासिकाग्रवर्ति गन्धादि- ग्रहण -शक्तिमद् इन्द्रियं घ्राणेन्द्रियमुच्यते ।।४५।।

(प्रश्न:-) ज्ञानेंद्रिये कोणती आहेत ? (उत्तर :-) श्रोत्र (=कान), त्वक् (=त्वचा), चक्षु (=डोळा), जीभ, आणि नाक. (यांचा खुलासा असा :-) श्रोत्र -इंद्रिय म्हणजे :- कानापेक्षा भिन्नअसणारे, कानाच्या पाळीने मर्यादित झालेल्या आकाशाच्या भागावर आश्रय घेऊन असणारे, आणि शब्द हा विषय ग्रहण करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे श्रोत्र इंद्रिय होय. त्वक् इंद्रिय म्हणजे :- त्वचेपेक्षा भिन्न असणारे, त्वचेच्या आधाराने रहाणारे, मस्तकापासून पायाच्या तळव्यापर्यंत व्यापून असणारे, आणि शीत, उष्ण इत्यादि स्पर्श ग्रहण करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे त्वक् इंद्रिय होय. चक्षु इंद्रिय म्हणजे :-डोळ्यापेक्षा वेगळे असणारे, डोळ्यांच्या आश्रयाने असणारे, (डोळ्यातील) काळ्या बाहुलीच्या टोकावर असणारे, आणि रूप इत्यादि विषय ग्रहण करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे चक्षु इंद्रिय होय.जिह्वा इंद्रिय म्हणजे :- जिभेपेक्षा वेगळे असणारे, जिभेच्या आश्रयाने रहाणारे, जिभेच्या टोकावर असणारे, आणि रस इत्यादि विषय ग्रहण करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे जिह्वा इंद्रिय होय. घ्राण इंद्रिय म्हणजे :- नाकापेक्षा वेगळे असणारे, नाकाच्या आश्रयाने रहाणारे, नाकाच्या टोकावर असणारे, आणि गंध इत्यादि विषय ग्रहण करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे घ्राण इंद्रिय, असे म्हटले जाते (४५).

पाच ज्ञानेंद्रियांची नावे, त्यांची स्थाने व त्यांची कार्ये येथे सांगितली आहेत. ही पाच ज्ञानेंद्रिये बाह्य जगातील शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पाच विषयांचे ग्रहण करण्याचे कार्य करतात.

येथे पुढील गोष्ट लक्षात घ्यावी :- स्थूल शरीराच्या बाह्य भागावर दिसणाऱ्या कान, डोळा, इत्यादीपेक्षा ही इंद्रिये भिन्न आहेत; याचे कारण असे की ही इंद्रिये सूक्ष्म शरीराचे घटक आहेत. तथापि बाहेर दिसणाऱ्या त्या त्या इंद्रियांच्या आश्रयानेच ती रहात असतात.

* * *

सूक्ष्म शरीराचे घटक असणाऱ्या पांच कर्मेंद्रियांची माहिती पुढील ४६ व्या खंडात आलेली आहे.

(४६)

कर्मेन्द्रियाणि कानि । वाक्-पाणि-पाद-पायूपस्थानि । वागिन्द्रियं नाम वाग् - व्यतिरिक्तं वागाश्रयं अष्टस्थानवर्ति शब्दोच्चारण-शक्तिमद् इन्द्रियं वागिन्द्रियमिति । अष्ट स्थानानि उर: -कण्ठ - शिरस्तालु - जिह्वा-दन्तौष्ठ-नासिका:। पाणीन्द्रियं नाम पाणि - व्यतिरिक्तं करतलाश्रयं दानादान-प्रतिग्रह-शक्तिमद् इन्द्रियं पाणीन्द्रियं इत्युच्यते । पादेन्द्रियं नाम पाद-

व्यतिरिक्तं पादाश्रयं पादतलवर्ति गमनागमनशक्तिमद् इन्द्रियं पादेन्द्रियमिति। पाय्विन्द्रियं नाम गुद-व्यतिरिक्तं गुदाश्रयं पुरीषोत्सर्गशक्तिमद् इन्द्रियं पाय्विन्द्रियमिति। उपस्थेन्द्रियं नाम उपस्थ -व्यतिरिक्तं उपस्थाश्रयं मूत्रशुक्रोत्सर्गशक्तिमद् इन्द्रियं उपस्थेन्द्रियमिति। एतानि कर्मेन्द्रियाणि ॥४६॥

(प्रश्न :-) कर्मेंद्रिये कोणती ? (उत्तर:-) वाक् (=वाचा, वाणी), पाणि (=हात), पाद (=पाय), पायु (=गुद) आणि उपस्थ (=जननेंद्रिय). वाग् इंद्रिय म्हणजे :- वाचेपेक्षा निराळे असणारे, वाचेच्या आश्रयाने रहाणारे, आठ स्थानी असणारे, शब्दांचा उच्चार करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे वाग् इंद्रिय होय. (वाक् इंद्रियाची) आठ स्थाने अशी आहेत :- ऊर, कंठ, शिर, तालु, जिह्वा, दात, ओठ आणि नाक. पाणि -इंद्रिय म्हणजे :- हातापेक्षा भिन्न असणारे, करतळाच्या आधाराने असणारे, देणे-घेणे-स्वीकार (या क्रिया) करण्याच्या शक्तीने युक्त असणारे इंद्रिय हे पाणि-इंद्रिय असे म्हटले जाते. पाद -इंद्रिय म्हणजे :- पायांपेक्षा वेगळे असणारे, पायांच्या आश्रयाने असणारे, पायाच्या तळव्यात रहाणारे, जाणे-येणे (या क्रिया) करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे पाद-इंद्रिय. पायु-इंद्रिय म्हणजे :- गुदापेक्षा भिन्न असणारे, गुदाच्या आश्रयाने असणारे, मलाचा उत्सर्ग / त्याग करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे पायु-इंद्रिय होय. उपस्थ -इंद्रिय म्हणजे :- जननेंद्रियापेक्षा निराळे असणारे, जननेंद्रियाच्या आश्रयाने असणारे, मूत्र आणि वीर्य यांचा उत्सर्ग करण्याची शक्ति असणारे इंद्रिय म्हणजे उपस्थ इंद्रिय होय. (अशी) ही कर्मेंद्रिये आहेत (४६).

पाच कर्मेंद्रिये, त्यांची स्थाने व त्यांची कर्मे येथे सांगितलेली आहेत. ज्ञानेंद्रियांप्रमाणेच कर्मेंद्रिये हीसुद्धा सूक्ष्म शरीराचे अवयव असल्याने, ती बाहेर दिसणाऱ्या हात, पाय, इत्यादीपेक्षा भिन्न आहेत असे म्हटलेले आहे, हेही लक्षात असावे.

येथे वाग्-इंद्रियाची आठ स्थाने आहेत असे म्हटले आहे. त्याचा खुलासा असा:- मानवी शरीरात वर्णांचा / शब्दांचा उच्चार करण्यास उपयोगी पडणारी आठ स्थाने आहेत." नाभि-स्थानातून प्रयत्नपूर्वक प्रेरित केलेला प्राण नावाचा वायु (मुखाकडे) वर येताना ऊर इत्यादि स्थानांवर आघात करतो; तेव्हा वर्ण किंवा वर्णाला व्यक्त करणाऱ्या ध्वनीची[१] उत्पत्ति होते." हा वायु कंठातून पुढे मुखावाटे बाहेर पडताना, जिभेकडून ठिकठिकाणी अडवला जातो. ती ती वर्णोच्चाराची स्थाने मानली जातात. येथे शिर शब्दाने मूर्धा हे स्थान अभिप्रेत आहे. दंतपंक्तीच्या किंचित् वरचे

---

१. नाभिप्रदेशात् प्रयत्न-प्रेरितो वायुः प्राणो नाम ऊर्ध्वं आक्रमन् उरःप्रभृतीनि स्थानानि आहन्ति। ततो वर्णस्य तदभिव्यंजकध्वनेः वा उत्पत्तिः। (तत्त्वबोधिनी).

स्थान म्हणजे तालु आणि त्याच्याही वरचे स्थान म्हणजे मूर्धा. अनुनासिक वर्णांचे उच्चारस्थान नासिका आहे. जिह्वामूलीय[१] वर्णांचे उच्चारस्थान जिह्वामूल आहे. अशी ही आठ[२] वर्णोच्चारस्थाने आहेत.

* * *

सूक्ष्म शरीराचे घटक असणाऱ्या मन आणि बुद्धि यांची माहिती पुढील खंड ४७ मध्ये दिलेली आहे.

(४७)

**अन्त: करणं नाम मनो बुद्धिश्चित्तमहंकारश्चेति। मन:स्थानं गलान्तम्। बुद्धेर्वदनम्। चित्तस्य नाभि:। अहंकारस्य हृदयम् ॥४७॥**

**अंत:करण म्हणजे मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार होय. मनाचे स्थान हे गळ्याच्या अंती आहे. बुद्धीचे स्थान मुख आहे. चित्ताचे स्थान नाभि आहे. आणि अहंकाराचे स्थान हृदय आहे (४७).**

"शम" चे स्पष्टीकरण करताना (खंड १७ पहा) शंकराचार्यांनी अंतरिंद्रिय म्हणजे मन असे म्हटले होते. आणि येथे ते अंत:करण म्हणजे मन, बुद्धि, चित्त व अहंकार असे सांगतात. यावरून त्यांनी अंतरिंद्रिय आणि अंत:करण या दोहोंत भेद केला आहे असे दिसते. या चारांना मिळून अंत:करणचतुष्टय असे म्हणतात. अंत:करण म्हणजे (शरीराच्या) आत असणारे करण म्हणजे साधन म्हणजे ज्ञानाचे साधन.

चित्ताचा अंतर्भाव बुद्धीत केला जातो आणि अहंकाराचा समावेश मनामध्ये केला जातो (खंड ४८ पहा). म्हणून मन व बुद्धि हे दोघेच रहातात आणि तेच दोघे सूक्ष्म शरीराचे घटक आहेत.

* * *

मन, बुद्धि इत्यादि चारांचे स्वरूप, त्यांचे विषय, आणि चित्त व अहंकार हे अनुक्रमे बुद्धि व मन यांत का अंतर्भूत होतात, याचा खुलासा पुढील खंड ४८ मध्ये केलेला आहे.

---

१. क, ख या वर्णांच्या पूर्वी जो अर्धविसर्गासारखा उच्चारला जातो, त्याला जिह्वामूलीय वर्ण म्हणतात. तो ᳵक, ᳵख असा दर्शविला जातो.

२. ही आठ स्थाने पुढीलप्रमाणे एका श्लोकात दिलेली आहेत :- अष्टौ स्थानानि वर्णानामुर: कण्ठ: शिरस्तथा। जिह्वामूलं च दंताश्च नासिकोष्ठौ च तालु च ॥

(४८)

एतेषां विषया: संशय-निश्चय-धारणाभिमाना:।अनुसंधानात्मिकान्त:-करण-वृत्तिश्चित्तम्। अभिमानान्त:करणवृत्तिरहंकार:। चित्तस्य बुद्धावन्तर्भाव: विषय-परिच्छित्ति-रूपत्वाविशेषात्। अहंकारस्य [illegible]न्तर्भाव: तस्यापि संकल्पात्मकत्वाविशेषात्। बुद्धेरपूर्वो विषय:। चित्तस्य पूर्वानुभव:। मनसो बाह्याभ्यन्तरश्च। अहंकारस्य त्वनात्मोपरक्त आत्मा एव इति ॥४८॥

(मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार) यांचे विषय म्हणजे कार्ये (अशी) आहेत :- संशय, निश्चय, धारणा आणि अभिमान. अनुसंधानाचे स्वरूप असणारी अंत:करणाची वृत्ति म्हणजे चित्त. अभिमान धारण करणारी अंत:करणाची वृत्ति म्हणजे अहंकार. चित्ताचा अंतर्भाव बुद्धीत केला जातो; कारण (ज्ञानाच्या) विषयाचे स्वरूप निश्चित करणे हे स्वरूप(दोहोंचेही) समानपणे आहे. अहंकाराचा अंतर्भाव मनामध्ये केला जातो; कारण "संकल्प" हे स्वरूप (दोहोंचेही) बाबतीत समान आहे. बुद्धीचा विषय अपूर्व असतो. पूर्वीचा अनुभव हा चित्ताचा विषय असतो. मनाचा विषय आत आणि बाहेर (असा दोन्ही प्रकारचा) असतो. अनात्म-वस्तूने झाकोळलेला आत्मा हाच अहंकाराचा विषय असतो (४८).

ज्ञानाचे समयी अंत:करणाची जी विशिष्ट स्थिति होते, तिला वृत्ति असे म्हणतात. अंत:करणाच्या वृत्ति मुख्यत: दोन आहेत :- (१) संशयात्मक, व (२) निश्चयात्मक. मन हे संकल्प-विकल्प[1] करणारे असल्याने, मन म्हणजे संशयात्मक अथवा अनिश्चयात्मक अशी अंत:करणाची वृत्ति होय. हे किंवा ते अशी मनाची द्विधा स्थिति असल्याने, तेथे निश्चयाचा अभाव असतो. मनाचा व्यापार विचाराच्या एका कोटीवर / बाजूवर स्थिर होत नाही; मन हे दोलायमान असते. हे मन ज्ञानेंद्रियांच्या मार्फत बाह्य पदार्थांचे ज्ञान करून घेते; तसेच आतील विचार इत्यादींचेही ज्ञान त्याला होते. म्हणून बाह्य आणि आंतर वस्तु या मनाचा विषय होतात असे म्हटले आहे.

अंत:करणाची निश्चयात्मक वृत्ति म्हणजे बुद्धि. मनातील द्विधा स्थिति दूर होऊन जेव्हा अंत:करणात निश्चय होतो, तेव्हा त्या वृत्तीला बुद्धि म्हणतात. म्हणूनच बुद्धि ही निश्चय हे स्वरूप[2] असणारी आहे असे म्हटले जाते. हा निश्चय पूर्वी झालेला नव्हता. म्हणून बुद्धीचा विषय अपूर्व (पूर्वी न झालेला) असतो, असे म्हटले आहे.

---

१. संकल्प-विकल्पात्मकं मन:।

२. निश्चयात्मिका / व्यवसायात्मिका बुद्धि:।

चित्त म्हणजे अनुसंधान हे स्वरूप असणारी अंत:करणाची वृत्ति होय. अनुसंधानात निरीक्षण व मुख्यत: स्मरण हे घटक असतात. हे घटक पूर्वी आलेल्या अनुभवाच्या संदर्भात संभवत असल्याने, पूर्वानुभव हा चित्ताचा विषय आहे असे म्हटले आहे. चित्त पूर्वानुभवाचे धारण करते.

अहंकार म्हणजे अंत:करणाची अभिमान हे स्वरूप असणारी वृत्ति होय. अभिमान म्हणजे:- मी म्हणजे अमुक तमुक; मला तमुक वस्तु पाहीजे; अमुक वस्तु माझी आहे, असे मानणे. वास्तविकपणे "मी" ने प्रत्यगात्मा सूचित होतो; पण तो न कळल्याने, स्त्री, पुत्र, शरीर, इंद्रिये, मन इत्यादि अनात्म -आत्मा नसणाऱ्या - पदार्थांना माणूस मी म्हणजे आत्मा मानू लागतो. म्हणून अनात्म पदार्थांनी झाकोळलेला आत्मा हा अहंकाराचा विषय होतो असे म्हटले आहे.

मन, बुद्धि, चित्त व अहंकार या अंत:करणाच्या चार वृत्ति कधी स्वतंत्र मानल्या जातात, तर कधी त्यांतील दोन वृत्तींचा समावेश उरलेल्या दोन वृत्तींत केला जाऊन "अंत:करण-द्वय" असाही शब्द वापरला जातो. प्रस्तुत खंडात चित्ताचा समावेश बुद्धीत केला आहे, आणि अहंकाराचा अंतर्भाव मनामध्ये केला आहे. याची कारणे अशी :- चित्त आणि बुद्धि यांचे स्वरूप समान आहे. " विषयाचे निश्चित ज्ञान" या बाबतीत ते दोघे समान आहेत. तसेच :- संकल्प हे मनाचे स्वरूप आहे; अहंकाराचे स्वरूपही तसेच आहे; मनाप्रमाणेच अहंकार हाही संकल्पात्मक आहे. शरीर म्हणजे मी, इंद्रिय म्हणजे मी इत्यादि संकल्प असेच अहंकाराचे स्वरूप आहे.

* * *

सूक्ष्म शरीराचे घटक असणाऱ्या पाच वायुरूप प्राणांची माहिती पुढील खंड ४९ देतो.

(४९)

**प्राणादि-वायु-पंचकं नाम प्राणापान-समानोदान-व्यानरूपा: । तेषां स्थानविशेषा उच्यन्ते । हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिदेशत: । उदान: कण्ठदेशस्थो व्यान: सर्व-शरीरग: । एतेषां विषया: । प्राण: प्रागगननवान् । अपान: अवागगननवान् । उदान ऊर्ध्वगमननवान् । समान: समीकरणवान् । व्यान: विष्वगगननवान् ।।४९।।**

**प्राण इत्यादि पाच वायूंचा समूह म्हणजे प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान हे (नाव असणारे वायु) होय. त्यांची (शरीरातील) विशिष्ट स्थाने (आता) सांगितली जात आहेत. "हृदया-मध्ये प्राण, गुदस्थानी अपान, नाभिदेशी समान, कंठाच्या प्रदेशात उदान, आणि सर्व शरीरभर व्यान असतो." या (पाच प्राणां) चे विषय म्हणजे कार्ये अशी आहेत :- प्राक् (म्हणजे पुढे) गमनादि क्रिया करणारा तो प्राण. अवाक् म्हणजे खाली (गमनादि) क्रिया करणारा अपान आहे. ऊर्ध्व म्हणजे वर (गमनादी) क्रिया करणारा उदान आहे. समीकरण (ही क्रिया ) करणारा समान आहे. (आणि शरीरात) सर्वत्र (गमनादि) क्रिया करणारा व्यान आहे (४९).**

शरीरात राहून निरनिराळी कार्ये करणाऱ्या वायूंना प्राण - वायु असे म्हटले जाते. प्राणवायु पाच प्रकारचा आहे. त्यांची नावे, स्थाने आणि कार्ये या खंडात सांगितली आहेत.

समीकरण हे समान नावाच्या प्राणाचे कार्य आहे. समीकरण ही पचनाची क्रिया आहे. अन्न, पान, इत्यादींचे पचन करून, त्यांचे रक्त, वीर्य, इत्यादि रूपांत परिवर्तन करण्याचे काम समान हा प्राण करतो.

* * *

वर खंड ४९ मध्ये जे पंचप्राण सांगितले ते मुख्य मानले जातात. त्यांचे जोडीने कधी कधी पाच उपप्राणही सांगितले जातात. या पाच उपप्राणांची नावे आणि कार्ये पुढील खंड ५० मध्ये दिली आहेत.

(५०)

**एतेषामुपवायव: पंच । नाग: कूर्मश्च कृकरो देवदत्तो धनंजय इति। एतेषां विषया: । 'नागादुद्गिरणं चापि कूर्मादुन्मीलनं तथा । धनंजयात् पोषणं च देवदत्ताच्च जृम्भणम् ।। कृकराच्च क्षुतं जातमिति योगविदो विदु: ' ।।५०।।**

या (प्राण इत्यादि वायूं) चे पाच उपवायु (म्हणजे पाच उपप्राण) आहेत. ते असे :- नाग, कूर्म, कृकर [१], देवदत्त आणि धनंजय. यांचे विषय म्हणजे कार्ये अशी आहेत :- नागामुळे उद्गिरण(वमन,ढेकर), कूर्मामुळे उन्मीलन (डोळ्यांच्या पापण्यांची उघडझाप), धनंजयामुळे पोषण, देवदत्तामुळे जृंभण (जांभई) आणि कृकरामुळे क्षुध् (भूक) उत्पन्न होते, असे योगवेत्ते लोक जाणतात(५०).

शरीरातील प्राण इत्यादींचे नियंत्रण करण्यास योगशास्त्र प्रक्रिया सांगते. साहजिकच त्या शास्त्रात प्राण, उपप्राण [२], इत्यादींचा विचार केला गेला आहे. योगवेत्ते लोक पाच उपप्राण सांगतात, असे येथे म्हटले आहे.

* * *

इंद्रियांना अधिष्ठात्या देवता मानल्या जातात. त्यांचा तपशील पुढील खंड ५१ मध्ये दिलेला आहे.

---

१. कृकर हा शब्द कधी कृकल असाही दिला जातो.

२. वेदान्तसार ग्रंथाचा रामतीर्थ हा टीकाकार असे सांगतो :- नाग हा उपप्राण उदानामध्ये, कूर्म हा व्यानामध्ये, कृकर हा समानमध्ये , देवदत्त हा अपानात, आणि धनंजय हा समानात समाविष्ट होतो.

(५१)

**एतेषां ज्ञानेन्दियादीनामधिपतयो दिगादय: । दिग् -वातार्क-प्रचेतोऽश्वि-वह्नीन्द्रोपेन्द्र-मित्रका: । तथा चन्द्रश्चतुर्वक्त्रो रुद्र: क्षेत्रज्ञ ईश्वर: । विशिष्टो विश्वस्रष्टा च विश्वयोनिरयोनिज: । क्रमेण देवता: प्रोक्ता: श्रोत्रादीनां यथाक्रमात् ।।५१।।**

**या ज्ञानेंद्रिय इत्यादींच्या अधिपति/अधिष्ठात्या देवता दिग् इत्यादि आहेत. (या देवता अशा:-) श्रोत्र इत्यादि इंद्रियांचा जसा क्रम आहे,त्या क्रमानुसार त्यांच्या देवता अशा सांगितलेल्या आहेत :- (अ) दिक्, वायु, सूर्य, प्रचेतस् (वरुण), अश्वि . (आ) अग्नि, इंद्र, उपेंद्र, मित्रक, चंद्र. (इ) चतुर्वक्त्र रुद्र, क्षेत्रज्ञ ईश्वर, विशिष्ट विश्वस्रष्टा,विश्वयोनि अयोनिज (५१).**

ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये व अंत:करणचतुष्टय यांच्याअधिष्ठात्या देवता अशा :-(अ) पाच ज्ञानेंद्रिये:- १) श्रोत्र-दिक् २) त्वचा -वायु ३) डोळा - सूर्य ४) रसना-प्रचेतस् (५) घ्राण-अश्वि (नावाचे देव). (आ) पाच कर्मेंद्रिये :- १) वाचा - अग्नि २) पाणि - इंद्र ३)पाय - उपेंद्र ४) पायु - मित्रक (आदित्य) ५) उपस्थ -चंद्र. (इ) मन, बुद्धि, चित्त व अहंकार यांच्या देवता :-१) मन-चतुर्वक्त्र रुद्र २) बुद्धि - क्षेत्रज्ञ ईश्वर ३) चित्त - विशिष्ट असा विश्वस्रष्टा (प्रजापति) ४) अहंकार - विश्वयोनि अयोनिज (ब्रह्मदेव).

* * *

सूक्ष्म शरीराच्या सतरा घटकांतच तीन कोश आहेत. ते कोश व त्यांची कार्ये ही पुढील खंड ५२ मध्ये सांगितली आहेत.

(५२)

**एषु प्राणमयकोष: क्रियाशक्तिमान् कार्यरूप: । मनोमय: इच्छाशक्तिमान् करणरूप: । विज्ञानमयो ज्ञानशक्तिमान् कर्तृरूप: । एतत् सर्वं मिलितं लिंगं शरीरं इत्युच्यते । कोषत्रयमुच्यते ।।५२।।**

**या (सूक्ष्म शरीराच्या घटकां) मध्ये असणारा प्राणमय कोश हा क्रियाशक्तीने युक्त असून कार्यरूप आहे; इच्छाशक्तीने युक्त असणारा मनोमय (कोश) हा करणरूप आहे; आणि ज्ञानशक्तीने युक्त असणारा विज्ञानमय (कोश) हा कर्तृरूप आहे. हे सर्व मिळून होणारे (शरीर हे) लिंग शरीर म्हटले जाते (अथवा) तीन कोषांचा समूह असे म्हटले जाते (५२).**

सूक्ष्म शरीराचे जे सतरा घटक आहेत, त्यांतील काही घटकांच्या समूहाला कोष असे नाव दिले जाते. जसे :- पाच ज्ञानेंद्रिये व मन मिळून मनोमय कोश होतो. पाच ज्ञानेंद्रिये व बुद्धि यांच्या मेळाव्याला विज्ञानमय कोश म्हणतात. आणि पाच कर्मेंद्रिये व पाच प्राण यांच्या समूहाला प्राणमय

कोश म्हणतात: (कोषांच्या विवरणासाठी खंड ६०-७२ पहा). हे तीनही कोश सूक्ष्म शरीराचे घटक आहेत. म्हणून हे तीन कोश म्हणजेच सूक्ष्म किंवा लिंग शरीर आहे. म्हणून त्याला कोषत्रय (तीन कोषांचा समूह ) असेही म्हटले जाते.

विज्ञानमय कोषात बुद्धि / विज्ञान प्रधान आहे. तेथे ज्ञानशक्ति आहे. हा विज्ञानमय कोश म्हणजेच ज्याला आपण व्यवहारात जीव म्हणतो तो होय (खंड ७०पहा). हा विज्ञानमय कोष (म्हणजेच जीव)" मी कर्ता "असा अभिमान धारण करतो. तो स्वत:ला कर्ता मानीत असल्याने तो कर्तृरूप (कर्ता हे स्वरूप असणारा) होतो. आता, या कर्त्याला क्रिया करण्यास काही साधन हवे; आणि हे साधन म्हणजे मनोमय कोश होय. मनोमय कोशात मन हे मुख्य आहे. संकल्प / काम/ इच्छा हे मनाचे स्वरूप आहे. म्हणून मनोमय कोश हा इच्छाशक्तीने युक्त आहे, असे म्हटले आहे. इच्छा असली तर क्रिया घडते. मनोमय कोश हा ज्ञानाला साधन-रूप / करण-स्वरूप आहे. पाच ज्ञानेंद्रिये व मन (= मनोमय कोश) याविना ज्ञान होऊ शकत नाही. असा हा मनोमय कोश ज्ञानाच्या प्राप्तीसाठी करण-रूप आहे. तसेच, विज्ञानमय कोश हा कर्ता आहे. त्याचेकडून काहीतरी कार्य घडावयास हवे. त्यासाठी प्राणमय कोश उपयुक्त आहे. प्राणमय कोश हा क्रियाशक्तीने युक्त आहे. कारण पंचप्राणांचे स्वरूपच क्रिया हेच आहे. तसेच कर्मेंद्रियेही क्रिया करतात. अशाप्रकारे प्राणमय कोशात क्रिया / कर्म प्रधान असल्याने, प्राणमय कोश हा कार्यरूप / क्रियारूप आहे, असे म्हटले आहे. अशा प्रकारे विज्ञानमय कोश हा कर्ता आहे; मनोमय कोश हा करण / साधन आहे; तो क्रियेकडे प्रवृत्ति किंवा निवृत्ति करण्याचे काम करतो. मनोमय कोशाच्या इच्छेनुसार प्राणमय कोश कार्याला लागतो. अशाप्रकारे लिंग शरीरातील विज्ञानमय कोश हा कर्ता, मनोमय कोश हा करण, आणि प्राणमयकोश हा क्रियारूप आहे.

* * *

सूक्ष्म शरीराचे वर्णन करणारा एक श्लोक शंकराचार्य खंड ५३ मध्ये उद्धृत करतात.

(५३)

**तथा चोक्तं - "पंचप्राण -मनो-बुद्धि-दशेन्द्रिय-समन्वितम् । अपंचीकृत -भूतोत्थं सूक्ष्मांगं भोग-साधनम् "** ॥५३॥

**आणि असे म्हटले आहे : अपंचीकृत भूतांपासून निर्माण होणारे, पाच प्राण, मन, बुद्धि व दहा इंद्रिये यांनी युक्त असणारे, असे सूक्ष्म शरीर हे भोगांचे साधन आहे (५३).**

खंड ४४ खाली सूक्ष्म शरीराचा खुलासा झाला आहे. सूक्ष्मांग म्हणजे सूक्ष्म शरीर. दशेन्द्रिये म्हणजे पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये मिळून दहा इंद्रिये. तेव्हा पाच प्राण, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, मन व बुद्धि या सतरा घटकांनी युक्त असे सूक्ष्म शरीर असते.

मागे खंड ४० मध्ये स्थूल शरीराला भोगांचे आयतन / आधारस्थान असे म्हटले होते. तर येथे सूक्ष्म शरीराला भोगांचे साधन म्हटले आहे. सूक्ष्म शरीरातील इंद्रिये व मन यांच्या साहाय्याशिवाय भोग भोगणे शक्य होत नाही. म्हणून येथे सूक्ष्म शरीराला भोगांचे साधन असे म्हटले आहे.

* * *

खंड ४४ मध्ये सूक्ष्म शरीराला 'लिंग' असे म्हटले होते. तसेच खंड ५२ मध्येही सूक्ष्म शरीराला लिंग शरीर म्हणतात असे सांगितले होते. या लिंग शब्दाचे स्पष्टीकरण आता पुढील ५४ व्या खंडात दिले आहे. तसेच खंड ४२ मध्ये दिलेले शरीर व देह या शब्दांचे व्युत्पत्ति -अर्थही या 'लिंग' ला लागू पडतात, असे पुढील खंड ५४ मध्ये दाखवून दिले आहे.

(५४)

**लीनमर्थं गमयति इति व्युत्पत्त्या लिंगं शरीरमित्युच्यते। कथं लीनम् । श्रवण-मननादिना गमयति ज्ञापयति। शीर्यते इति व्युत्पत्त्या शरीरमित्युच्यते। कथं शीर्यते इति चेत् , अहं ब्रह्मास्मीति ब्रह्मात्मैकत्व-ज्ञानेन शीर्यते । दह भस्मीकरणे इति व्युत्पत्त्या लिंगदेहस्य पृथिवीपुर:सरं क्षय इत्युच्यते ।।५४।।**

**लीन (=गूढ /दडलेल्या) अर्थाला म्हणजे पदार्थाला / वस्तूला जे जाणवून देते (गमयति) ते लिंग, या व्युत्पत्तीला अनुसरून, 'लिंग' हा शब्द बनला आहे; त्याला शरीर असे म्हटले जाते. (प्रश्न:-) (हे लिंग शरीर) गूढ / दडलेल्या वस्तूला कसे बरे जाणवून देते? (उत्तर :-) श्रवण, मनन, इत्यादींच्या द्वारा (लिंग शरीर हे गुप्त प्रत्यगात्म्याला /अंतरात्म्याला) जाणवून देते म्हणजे त्यांचे ज्ञान करून देते. (तसेच) जे नष्ट होते ते शरीर, या व्युत्पत्तीला अनुसरून (लिंग हे) शरीर आहे असे म्हटले जाते. (आता लिंग हे) कसे बरे नष्ट होते, असे जर विचारले,तर त्याचे उत्तर असे आहे :-" मी ब्रह्म आहे" अशा स्वरूपात होणाऱ्या ब्रह्म व आत्मा यांच्या (साक्षात्कारजन्य) ऐक्याच्या ज्ञानाने (लिंग शरीर) नष्ट होऊन जाते. (शरीरालाच देह असा समानार्थी शब्द आहे. देह हा शब्द) दह् म्हणजे भस्मीभूत होणे या व्युत्पत्तीला धरून (बनलेला) आहे. पृथ्वीपासून प्रारंभ होऊन लिंग देहाचा नाश (भस्मीभाव) होतो, असे म्हटले जाते (५४).**

लिंग म्हणजे जे गुप्त / दडलेल्या गोष्टीचे ज्ञान करून देते ते. प्रत्यगात्मा / अंतरात्मा (=ब्रह्म) शरीरात गूढ रूपाने आहे; त्याचे ज्ञान सूक्ष्म शरीर करून देते ते असे :- श्रवण, मनन, निदिध्यासन यांचेद्वारा गूढ अंतरात्मा मुमुक्षूच्या साक्षात्काराला येतो. कारण श्रवण, मनन व निदिध्यासन यांसाठी सूक्ष्म शरीरातील मन आणि बुद्धि हे उपयोगी आहेत. म्हणून गूढ असणाऱ्या अंतरात्म्याचे /ब्रह्माचे ज्ञान करून देण्यास उपयुक्त असे लिंग शरीर आहे.

या लिंगालाही शरीर हा शब्द लावला जातो. कारण "नष्ट होते ते शरीर "या व्युत्पत्तीनुसार, लिंग हे नाश पावणारे असल्याने, त्याला शरीर असे म्हणतात. श्रवण, मनन व निदिध्यासन यांच्या द्वारा "मी ब्रह्म आहे" (अहं ब्रह्म अस्मि) असा साक्षात्कार होऊन, ब्रह्म आणि आत्मा हे एकच आहेत, असे त्यांच्या ऐक्याचे ज्ञान झाले की लिंग शरीर नष्ट होऊन जाते.

याच लिंगाला देह असेही म्हणतात. जो भस्मसात् होतो म्हणजेच जो नष्ट होऊन जातो तो देह अशी देह या शब्दाची व्युत्पत्ति आहे. भस्मसात् होणे म्हणजेच नष्ट होणे. पृथ्वीपासून प्रारंभ होऊन लिंग देहाचा नाश होतो असे येथे म्हटले आहे. त्याचा उलगडा होण्यासाठी येथे अपवादाची प्रक्रिया जाणून घेतली पाहीजे.

मागे खंड ३७ खाली असे म्हटले होते की गुरु शिष्याला अध्यारोप आणि अपवाद यांच्या द्वारा ब्रह्माचे विवेचन समजावून देतात. त्यातील अध्यारोपाची प्रक्रिया ही विश्वाच्या उत्पत्तीशी संबंधित आहे, तर अपवादाची प्रक्रिया ही विश्वाच्या प्रलयाशी संबंधित आहे. अपवादाची प्रक्रिया तांत्रिक भाषेत अशी सांगितली जाते :- (१) रज्जूवर सर्पाचा अध्यारोप होतो. तेथे सर्पाला रज्जूपेक्षा स्वतंत्र अस्तित्व नाही. म्हणून तो सर्प रज्जुरूप आहे, असे ज्ञान होणे आवश्यक आहे. याचप्रमाणे ब्रह्म या वस्तूवर अवस्तु असणाऱ्या अज्ञान इत्यादि प्रपंचाचा अध्यारोप होतो. येथे अवस्तु म्हणजे अज्ञान इत्यादि प्रपंच हा वस्तु असणाऱ्या ब्रह्मापेक्षा स्वतंत्र नाही. त्याला ब्रह्मापेक्षा वेगळे स्वतंत्र अस्तित्व नाही, तो वस्तुरूप / ब्रह्मरूप आहे, असे ज्ञान झाले की अपवाद [१] झाला. वेगळ्या शब्दांत :- वस्तूवर / ब्रह्मावर / शुद्ध चैतन्यावर अवस्तु असणारा अज्ञान इत्यादि प्रपंच विवर्तरूपाने भासतो. ज्या अधिष्ठानावर / आधारावर विवर्त भासतो, त्या अधिष्ठानापेक्षा विवर्तरूप पदार्थाला स्वतंत्र अस्तित्व असत नाही, विवर्त हा अधिष्ठानरूपच असतो, असे कळणे म्हणजे अपवाद. (२) कार्यकारणाच्या भाषेत अपवादाचे स्पष्टीकरण असे :- कार्य हे नेहमी कारणरूपाने असते, कारणापेक्षा कार्याला स्वतंत्र अस्तित्व [२] नाही, असे समजून घेणे म्हणजे अपवाद होय. जसे :- विश्व हे कार्य चिद् -ब्रह्म या कारणरूपानेच आहे अथवा चिद्रूप ब्रह्मापेक्षा विश्वाला वेगळे असे स्वतंत्र अस्तित्व नाही असे जाणणे म्हणजे अपवाद होय.

अध्यारोपात कारणापासून कार्य अशी प्रक्रिया सांगितली जाते. तर अपवादात त्याच्या उलट क्रमाने शुद्ध चैतन्याप्रत जाता येते. वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास, प्रलयाचे वेळी कार्य

---

१. अपवादो नाम रज्जुविवर्तस्य सर्पस्य रज्जुमात्रत्ववद् वस्तुविवर्तस्य अवस्तुनः अज्ञानादेः प्रपंचस्य वस्तुमात्रत्वम् । (वेदान्तसार)

२. कार्यस्य कारण-मात्र-सत्तावशेषणं कारण-स्वरूप-व्यतिरेके कार्यस्य असत्तावधारणं वा अपवादः । (वेदान्तसारवरील विद्वन्मनोरंजनी टीका).

हे आपल्या निकटच्या पूर्ववर्ती कारणात एकरूप होऊन जाते, असे सांगितले जाते. जसे :- प्रथम चार प्रकारचे स्थूल देह, अन्न-पान किंबहुना सर्व स्थूल ब्रह्मांड हे आपले कारण असणाऱ्या स्थूल पंचीकृत पंच महाभूतांत लय पावून त्यांच्याशी एकरूप[१] होतात. पंचीकृत स्थूल भूते आणि सर्व सूक्ष्म शरीरे ही आपले कारण असणाऱ्या अपंचीकृत भूतांत विलीन होऊन तद्रूप[२] होऊन जातात. त्यानंतर उत्पत्तीच्या उलट क्रमाने, सत्वादिगुणांसहित अपंचीकृत भूते ही स्वत:चे कारण असणारे जे अज्ञानाची उपाधि असणारे चैतन्य[३], त्यात मिळून तद्रूप होऊन जातात. नंतर शेवटी, हे अज्ञानाची उपाधि असणारे चैतन्य ब ईश्वर इत्यादि हे स्वत:ला आधार / अधिष्ठान असणारे जे उपाधिरहित / शुद्ध चैतन्य (म्हणजे ब्रह्म) त्यांत लीन[४] होऊन तद्रूप होऊन जातात.

आता सूक्ष्म / लिंग शरीराच्या संदर्भात नाशाचा तपशील असा सांगता येईल :- लिंग / सूक्ष्म देह हा सूक्ष्म / अपंचीकृत अशा आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी या भूतांपासून निर्माण झालेला आहे. या पाच सूक्ष्म भूतांची उत्पत्ति ज्या क्रमाने झाली त्याच्या उलट क्रमाने त्यांचा लय होतो. अज्ञानाची उपाधि असणाऱ्या चैतन्यापासून आकाश, आकाशातून वायु , वायूपासून तेज व तेजातून जल आणि जलापासून पृथ्वी असा उत्पत्तीचा क्रम होता. या सूक्ष्म भूतांचा लय होताना प्रथम पृथ्वीपासून प्रारंभ होतो. प्रथम पृथ्वी जलरूप होते, जल तेजोरूप होते, तेज हे वायुरूप होते, वायु आकाशरूप होतो. ( या पुढील लयाचा क्रम वर सांगितलेला आहेच). म्हणून पृथ्वीपासून प्रारंभ होऊन लिंग शरीराचा लय / नाश होतो, असे येथे म्हटले आहे.

* * *

अनात्मा म्हणजे तीन शरीरांचा समूह असे खंड ३८ मध्ये म्हटले होते. त्यांतील स्थूल व सूक्ष्म शरीरांचे विवेचन झाले. आता उरलेले जे तिसरे कारण शरीर त्याचे विवेचन पुढील खंड ५५ मध्ये आहे.

## (५५)

**कारणशरीरं नाम शरीर-द्वय-हेतु:। अनाद्यनिर्वचनीयं साभासं ब्रह्मात्मैकत्व-ज्ञान-निर्वर्त्यं अज्ञानं कारणशरीरमुच्यते। तथा चोक्तं -अनाद्यविद्यानिर्वाच्या कारणोपाधिरुच्यते।**

---

१. एतत् सर्वं एतेषां कारणरूपं पंचीकृतभूतमात्रं भवति। (वेदान्तसार)

२. एतानि शब्दादिविषयसहितानि पंचीकृतानि भूतानि सूक्ष्मशरीरजातं च एतत् सर्वं एतेषां कारण-रूप-अपंचीकृतभूत-मात्रं भवति। (वेदान्तसार).

३. एतानि सत्वादिगुणसहितानि अपंचीकृतानि उत्पत्ति-व्युत्क्रमेण तत्कारणभूत-अज्ञानोपहित-चैतन्यमात्रं भवति। (वेदान्तसार)

४. एतद् अज्ञानोपहितं चैतन्यं च ईश्वरादिकं एतदाधाराभूत-अनुपहित-चैतन्यरूपं तुरीयं ब्रह्ममात्रं भवति। (वेदान्तसार)

**उपाधि-त्रितयादन्यमात्मानमवधारयेत् ।। शीर्यते इति व्युत्पत्त्या शरीरमित्युच्यते । कथमिति चेत् , ब्रह्मात्मैकत्वज्ञानेन शीर्यते । दह भस्मीकरणे इति व्युत्पत्त्या कारणशरीरस्य पृथिवीपुर:सरं इत्युच्यते ।।५५।।**

कारण शरीर म्हणजे ते की जे (स्थूल व सूक्ष्म या) दोन शरीरांचा हेतु / कारण आहे. अनादि, अनिर्वचनीय, भासमान होणारे, ब्रह्म व आत्मा यांच्या एकत्वाच्या ज्ञानाने निवृत्त होणारे असे जे अज्ञान, त्यालाच कारण शरीर असे म्हटले जाते. आणि तसेच म्हटलेले आहे :-"अनादि आणि अनिर्वाच्य अशा अविद्येला (अज्ञानाला) कारण-उपाधि असे म्हटले जाते. तीनू (शरीरांच्या) उपाधींच्या समूहापेक्षा आत्मा वेगळा आहे असे जाणावे." नष्ट होऊन जाते ते शरीर, या व्युत्पत्तीनुसार (कारणाला) शरीर म्हटले जाते. ते कसे काय, असे जर विचारले, तर उत्तर असे आहे :- ब्रह्म आणि आत्मा यांच्या ऐक्याच्या ज्ञानाने (हे अज्ञान म्हणजेच कारण शरीर) नष्ट होऊन जाते. (या कारण शरीराला देह असेही म्हणतात). दह् म्हणजे भस्मीभूत होणे (म्हणजेच नष्ट होऊन जाणे). (आणि भस्मीभूत होतो म्हणजेच नष्ट होतो तो देह) या व्युत्पत्तीनुसार, पृथ्वीपासून प्रारंभ होऊन, कारण-शरीराचा नाश होतो, असे म्हटले जाते (५५).

केवलाद्वैत वेदान्तात स्थूल आणि सूक्ष्म या दोन शरीरांच्या जोडीने ' कारण' हे नाव दिले गेलेले एक तिसरे शरीर मानले जाते. स्थूल व सूक्ष्म या शरीरांना कारणीभूत असणारे ते कारण शरीर होय. अज्ञानालाच कारण शरीर असे म्हटले जाते.

खंड ३७ खाली अध्यारोपाची प्रक्रिया सांगताना, ब्रह्माला अज्ञानाची उपाधि येते असे सांगितले होते. तसेच अज्ञानाकडे व्यष्टि व समष्टि या दोन दृष्टिकोनांतून पहाता येते असेही म्हटले होते. अज्ञान- समष्टि ही उपाधि असणारा ईश्वर होय. ईश्वराची ही अज्ञान-समष्टि ही विश्वातील सर्व स्थूल आणि सूक्ष्म शरीरांचे कारण आहे, म्हणून तिला[१] कारण शरीर असे म्हटले जाते. अज्ञान - व्यष्टि ही उपाधि प्राज्ञला असते; ती अहंकार इत्यादींचे कारण आहे; म्हणून तिलाही कारण शरीर[२] असे म्हणतात.

या अज्ञानाचे विवरण मागे खंड ९ मध्ये आले होते. तेथे अज्ञानाला 'ज्ञानविरोधि' असे म्हटले होते. त्याचाच अधिक खुलासा येथे 'ब्रह्मात्मैकत्व-ज्ञान-निवर्त्य ' या शब्दांत केलेला आहे.

---

१. ईश्वरस्येयं समष्टि: अखिलकारणत्वात् कारणशरीरं... इति उच्यते। (वेदान्तसार)
२. अस्यापि इयं अहंकारादि-कारणत्वात् कारणशरीरं.... इति उच्यते। वेदान्तसार)

**हे अज्ञान म्हणजेच अनादि आणि अनिर्वाच्य म्हणजे अनिर्वचनीय अशी अविद्या आहे. 'अनादि' व 'अनिर्वचनीय' या शब्दांचे स्पष्टीकरण मागे खंड ९ खाली झाले आहे.**

कारण शरीर, सूक्ष्म शरीर व स्थूल शरीर या तीन शरीरांच्या समूहाची उपाधि (उपाधि-त्रितय) शुद्ध चैतन्याला / ब्रह्माला / आत्म्याला येते. तथापि आत्मा त्या उपाधीपेक्षा वेगळा आहे हे जाणून घ्यावयास हवे.

अज्ञान म्हणजे कारण शरीर. शरीर या शब्दाऐवजी देह शब्द वापरून कारण देह असेही म्हणता येते. अज्ञान / कारण हा देह असल्याने तो नष्ट होणारा आहे. ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्याच्या ज्ञानाने अज्ञानाचा / कारण देहाचा नाश [१] होऊन जातो.

* * *

मागे खंड ३८ मध्ये अनात्मा म्हणजे "अनृत-जड-दुखात्मकं समष्टि-व्यष्ट्यात्मक-शरीर-त्रयम्" असे म्हटले होते. त्यातील अनृत, जड, आणि दुःखात्मक या शब्दांचे स्पष्टीकरण पुढील खंड ५६ मध्ये आहे.

(५६)

**अनृत-जड-दुःखात्मकमित्युक्तम्। अनृतं नाम कालत्रयेषु अविद्यमानवस्तु अनृतं उच्यते। जडं नाम स्वविषय-परविषय-ज्ञानरहितं वस्तु जडं इत्युच्यते। दुःखं नाम अप्रीतिरूपं वस्तु दुःखं इत्युच्यते ॥५६॥**

**(मागे अनात्म पदार्थांचे वर्णन करताना) 'अनृत, जड व दुःख हे स्वरूप असणारे' असे म्हटले होते. (त्यांचे स्पष्टीकरणआता केले जात आहे :-) अनृत म्हणजे तीनही काळांत अस्तित्वात नसणारी जी वस्तु तिला अनृत असे म्हटले जाते. जड म्हणजे जिला स्वतःविषयी तसेच दुसऱ्या (पदार्था) विषयी ज्ञान नसते, ती वस्तु जड असे म्हटले जाते. दुःख म्हणजे अप्रीति (= सुखाचा अभाव) हे स्वरूप असणारी वस्तु दुःख म्हटली जाते (५६).**

व्यष्टि-रूप आणि समष्टिरूप असणारी स्थूल, सूक्ष्म व कारण ही तीन शरीरे म्हणजे अनात्मा होय (खंड ३८ पहा). ही तीनही शरीरे तीन काळांत नसतात; कारण ती नाशवंत आहेत. त्यांना स्वतःचे व इतरांचे ज्ञान होत नाही; कारण ती अचेतन / ज्ञानरहित आहेत. शरीरधारणेअंती दुःख होते असे मागे खंड ३ मध्ये सांगितले आहे. कारणशरीर म्हणजे अज्ञान हे तर सर्व दुःखांचे मूळ आहे. या कारणाने या तीनही शरीरांना दुःखरूप म्हणण्यात काहीच अडचण नाही.

---

**१. मागे खंड ५४ खाली अपवादाची प्रक्रिया सांगताना 'पृथिवीपुरःसरं' या शब्दांचा खुलासा केलेला होता. तोच येथेही अभिप्रेत आहे, असे दिसते.**

खंड ३८ मध्ये अनृत-जड-दु:खात्मक असे ' व्यष्टि-समष्ट्यात्मक-शरीरत्रय 'असे म्हटले होते. त्यातील व्यष्टि आणि समष्टि या दोन शब्दांचा खुलासा आता पुढील खंड ५७ मध्ये केला आहे.

(५७)

**समष्टि-व्यष्ट्यात्मकं इत्युक्तम् । किं समष्टि : । किं व्यष्टि: । यथा वनस्य समष्टि: । यथा वृक्षस्य व्यष्टि: । अथवा जलाशयस्य समष्टि: जलस्य व्यष्टि: । तद्‌वद् अनेकशरीर-समष्टि: । एकशरीरस्य व्यष्टि : ॥५७॥**

(अनात्म पदार्थांचे विवेचन करताना) 'समष्टि आणि व्यष्टि स्वरूप असणारे' (शरीर-त्रय) असे म्हटले होते. (प्रश्न :-) समष्टि म्हणजे काय ? व्यष्टि म्हणजे काय ? (उत्तर :) जसे :- वन हे समष्टि, वृक्ष ही व्यष्टि. अथवा :- जलाशय ही समष्टि आणि जल ही व्यष्टि. त्याप्रमाणे अनेक शरीरे म्हणजे समष्टि आणि एक शरीर म्हणजे व्यष्टि (५७).

अज्ञान या कारणापासून सर्व सूक्ष्म आणि स्थूल शरीरे उत्पन्न होतात. अज्ञानालाही कारण-शरीर असे म्हटले जाते. या तीनही शरीरांकडे व्यष्टि व समष्टि या दोन दृष्टिकोनांतून पहाता येते.

समष्टि म्हणजे समूह, संपूर्ण व्याप्ति, व्यापकता; सर्वांना व्यापून असते ती समष्टि; अनेक किंवा सर्व मिळून एक असा दृष्टिकोन समष्टीत असतो. म्हणून समष्टि ही एक असते. याउलट व्यष्टि आहे. व्यष्टि या दृष्टिकोनात एकच व्यक्ति लक्षात घेतली जाते. म्हणजे अनेकांतील / सर्वांतील एक वस्तु / व्यक्ति असा व्यष्टीचा दृष्टिकोन असतो. व्यष्टि ही मर्यादित व अनेक असते. संक्षेपाने, अनेकांचा समूह म्हणजे समष्टि आणि अनेकांतील एक म्हणजे व्यष्टि. जसे :- अनेक वृक्षांचा समूह या दृष्टीने पाहिले म्हणजे 'वन' ही समष्टीची कल्पना येते; वन म्हणजे अनेक वृक्षांचा समुदाय. याउलट वनातील एकेक वृक्ष लक्षात घेतला तर ती व्यष्टीची कल्पना होते. म्हणून वनातील एकच वृक्ष म्हणजे व्यष्टि. किंवा दुसरे उदाहरण :- जलाशय म्हणजे अनेक जलबिंदूंचा समुदाय आहे; म्हणून जलाशय ही समष्टि. त्या जलाशयातील प्रत्येक जलबिंदु ही व्यष्टि आहे.

व्यष्टि व समष्टि या दृष्टिकोनांतून तीन शरीरांकडे पहाता येते. तसे केल्यावर, अज्ञान-समष्टि व अज्ञान-व्यष्टि म्हणजेच कारणशरीरसमष्टि आणि कारणशरीरव्यष्टि, सूक्ष्मशरीरसमष्टि व सूक्ष्मशरीरव्यष्टि, आणि स्थूलशरीरसमष्टि व स्थूलशरीरव्यष्टि या संकल्पना येतात ( मागे खंड ३७ खाली पहा).

* * *

**खंड ३७ मध्ये आत्म्याचे स्वरूप सांगताना, तो "अवस्था-त्रय-साक्षी" आहे असे म्हटले होते. अवस्था-त्रय म्हणजे तीन अवस्थांचा समूह. या तीन अवस्थांचे वर्णन खंड ५८ मध्ये केले आहे.**

**(५८)**

**अवस्था-त्रयं नाम जाग्रत्-स्वप्न-सुषुप्तय:। जागरणं नाम इन्द्रियैरर्थोपलब्धि: जागरणम्। स्वप्नो नाम जागरित-संस्कारज-प्रत्यय: सविषय:। सुषुप्तिर्नाम सर्व-विषय-ज्ञानाभाव: ।।५८।।**

**तीन अवस्थांचा समूह म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति (या तीन अवस्था होत). जागृति/ जागरण म्हणजे :- इंद्रियांचे द्‌वारा पदार्थांचे ज्ञान होणे (ही गोष्ट ज्या अवस्थेत घडते ती म्हणजे) जागरण / जागृति (अवस्था होय). स्वप्न म्हणजे :- जागृति या अवस्थेतील संस्कारांमुळे होणारे विषयांचे ज्ञान (ज्या अवस्थेत होते ती स्वप्न अवस्था होय). सुषुप्ति म्हणजे सर्व विषयांच्या ज्ञानाचा अभाव (ज्या अवस्थेत असतो, ती सुषुप्ति अवस्था होय) (५८).**

चैतन्याला स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरीरांच्या उपाधि आल्या की तेथे तीन अवस्था निर्माण होतात. त्या म्हणजे जागृति / जागरण, स्वप्न, आणि सुषुप्ति / निद्रा. या तीनही अवस्था एकाच वेळी असत नाहीत. त्या आलटून पालटून येत असतात.

स्थूल शरीराअंती जागृति ही अवस्था येते. या अवस्थेत पाच ज्ञानेंद्रिये आणि मन यांच्याद्‌वारा बाह्य जगातील शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या विषयांचे ज्ञान होत असते. यावेळी बुद्‌धीचेही कार्य चालू असते. (मागे खंड ४८मध्ये पाहिल्याप्रमाणे मनात अहंकाराचा अंतर्भाव होतो, आणि बुद्‌धीमध्ये चित्ताचा समावेश होतो).

सूक्ष्म शरीराअंती स्वप्न ही अवस्था येते. जागृति अवस्थेत जी काही ज्ञाने आणि क्रिया होत असतात, त्यांचे काही संस्कार मनावर उमटतात. बाह्य दहा इंद्रियांचे काम बंद असताना, जेव्हा जागृतीतील काही विशिष्ट संस्कारांनी मनाला काही सूक्ष्म विषयांचे ज्ञान होते, तेव्हा ती स्वप्न-अवस्था होते. या अवस्थेत बुद्‌धि ही कार्यप्रवण असते.

अज्ञानरूप कारण-शरीरामुळे सुषुप्ति अवस्था होते. जेव्हा इंद्रिये, मन व बुद्‌धि यांचे कार्य बंद होऊन, स्थूल किंवा सूक्ष्म अशा कोणत्याही विषयाचे ज्ञान नसते, तेव्हा ती सुषुप्ति अवस्था असते.

* * *

तीन शरीरांच्या उपाधीमुळे शुद्‌ध चैतन्याला / ब्रह्माला / आत्म्याला तीन अवस्था प्राप्त होतात. त्या त्या शरीरावर अभिमान धारण केल्यामुळे, त्या उपाधीत सापडलेल्या चैतन्याला / आत्म्याला तीन वेगवेगळी नावे दिली जातात. ही नावे पुढील खंड ५९ मध्ये दिली आहेत.

**(५९)**

**जाग्रत्-स्थूल-शरीराभिमानी विश्व:। स्वप्न-सूक्ष्म-शरीराभिमानी तैजस:। सुषुप्ति-कारण-शरीराभिमानी प्राज्ञ : ।।५९।।**

**आत्मानात्मविवेक:**

**जागृति व स्थूल शरीर यांचा अभिमान धारण करणारा तो विश्व (-आत्मा). स्वप्न आणि सूक्ष्म शरीर यांचा अभिमान बाळगणारा तो तैजस (-आत्मा) आणि सुषुप्ति व कारण-शरीर यांचा अभिमान धारण करणारा तो प्राज्ञ (-आत्मा) होय (५९).**

अज्ञानाला कारण शरीर म्हणतात. त्यापासून सूक्ष्म व स्थूल शरीरे उत्पन्न होतात. या तीनही प्रकारच्या शरीरांकडे व्यष्टि आणि समष्टि या दृष्टिकोनांतून पहाता येते. या तीनही प्रकारच्या शरीरांच्या उपाधि चैतन्याला / आत्म्याला आल्यावर तीन अवस्था येतात आणि ती शरीरे व अवस्था यांचा अभिमान बाळगणाऱ्या आत्म्याला भिन्न नावे दिली जातात. प्रस्तुत खंडात[१] व्यष्टि -उपाधि- अंती चैतन्याला / आत्म्याला दिली जाणारी नावे दिलेली आहेत; ती अशी :-

| शरीर-व्यष्टि-उपाधि | अवस्था | आत्म्याला दिले जाणारे नाव |
|---|---|---|
| कारण शरीर (अज्ञान) | सुषुप्ति | प्राज्ञ (-आत्मा) |
| सूक्ष्म शरीर | स्वप्न | तैजस (-आत्मा) |
| स्थूल शरीर | जागृति | विश्व (-आत्मा) |

* * *

तीन प्रकारच्या शरीरांच्या उपाधि आत्म्याला येतात हे पाहून झाले. या त्रिविध देहांचे स्पष्टीकरण कोष हा शब्द वापरूनही करता येते. तीन शरीरांचे पाच कोष होतात. या पाच कोषांची नावे देऊन त्यांचे परिगणन पुढील ६० व्या खंडात आहे.

**(६०)**

**कोष-पंचकं नाम अन्नमय-प्राणमय-मनोमय-विज्ञानमय-आनंदमयाख्या:। अत्र मयट् -प्रत्ययो विकारार्थे । तथा च ॥६०॥**

**पाच कोषांचा समूह म्हणजे :- (१) अन्नमय (२) प्राणमय (३) मनोमय (४) विज्ञानमय आणि (५) आनंदमय ही नावे असणारे पाच कोष आहेत. येथे (म्हणजे कोष-नामांच्या उत्तरपदात) 'मयट्' हा प्रत्यय विकार (हा अर्थ) दाखविण्यासाठी आला आहे. अधिक स्पष्ट करून सांगायचे झाल्यास - (६०).**

स्थूल देह हा अन्नाने बनत असल्यामुळे त्यालाच अन्नमय कोश म्हणतात (खंड ६७ पहा). खंड ५२ मध्ये पाहिल्याप्रमाणे, सूक्ष्म शरीर म्हणजेच प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय हे तीन कोष होत. कारणदेह म्हणजे अज्ञान (खंड ५५ पहा). या कारणशरीरालाच आनंदमय कोश असे म्हणतात (खंड ६५,७२ पहा).

---

१. शरीर-समष्टीच्या उपाधीअंती चैतन्याला दिली जाणारी नावे मागे खंड ३७ खाली दिलेल्या अध्यारोपाच्या प्रक्रियेत आलेली आहेत.

या पाचांना कोष म्हणण्याचे कारण असे आहे :- कोष/कोश म्हणजे आच्छादन / आवरण घालणारा पदार्थ. उदा. गवसणी तंबोऱ्याला आवरण घालते. म्यान हे खड्गाला आच्छादित करते. म्हणजे कोष हा आपण आच्छादित केलेल्या वस्तूचे ज्ञान होऊ देत नाही. त्याप्रमाणे अन्नमय इत्यादि पाच कोश हे शुद्ध चैतन्यावर / आत्म्यावर आवरण घालतात आणि सहजासहजी आत्म्याचे ज्ञान होऊ देत नाहीत. अशा प्रकारे ते कोषाप्रमाणे कार्य करीत असल्याने, त्यांना कोष असे म्हटले जाते.

अन्नमय, इत्यादि कोषांच्या नावांमध्ये उत्तरपदी 'मय' हा शब्द आहे. 'मय' हा शब्द संस्कृत भाषेत एकाद्या शब्दापुढे प्रत्यय म्हणून येतो. त्याला संस्कृत व्याकरणाच्या तांत्रिक भाषेत 'मयट्' हे नाव आहे. हा मयट् / मय हा प्रत्यय विकार/ परिणाम/ कार्य दाखविण्यासाठी वापरला जातो. ज्याचा विकार / परिणाम दाखवावयाचा आहे, त्याच्यापुढे मयट् / मय प्रत्यय ठेवला जातो. उदा. काष्ठाचा विकार / परिणाम दाखविताना 'काष्ठ' पुढे मय प्रत्यय ठेवला जातो आणि मग 'काष्ठमय' असा शब्द बनतो. त्याचा अर्थ 'काष्ठापासून बनलेला' असा होतो. प्रस्तुत स्थळी, विकार या अर्थी मयट् प्रत्यय हा अन्नमय कोशाच्या बाबतीत शब्दश: खरा आहे. पण अन्य कोशनामांत मयट्चा दुसरा अर्थ अभिप्रेत आहे. प्राचुर्य दाखविण्यासही मयट् प्रत्यय वापरला जातो. प्राणमय, मनोमय व विज्ञानमय या कोशांत प्राण, मन, व विज्ञान हे मुख्य आहेत, तर आनंदमय कोशात आनंदाचे प्राचुर्य आहे. म्हणून प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय या शब्दांत मय हा प्रत्यय प्राधान्य /प्राचुर्य दाखविण्यास वापरला आहे असे म्हणता येते.

या खंडात शेवटी 'तथा च' असे शब्द वापरून, या पाच कोषांचे अधिक स्पष्टीकरण करणारा भाग पुढे येतो, असे दाखविले आहे.

* * *

या पाच कोषांचे स्पष्टीकरण प्रथम पद्यात आणि नंतर गद्यात दिलेले आहे. ६१ ते ६५ खंड पद्यात आहेत तर ६७ ते ७२ हे खंड गद्यात आहेत. अन्नमय कोषाचे विवरण करणारा श्लोक खंड ६१ मध्ये दिलेला आहे.

(६१)

पितृभुक्तान्नजाद् वीर्याज्जातोऽन्नेनैव वर्धते ।
देह: सोऽन्नमयो नात्मा प्राक् चोर्ध्वं तदभावत: ।।६१।।

**मातापित्यांनी भक्षण केलेल्या अन्नापासून उत्पन्न झालेल्या वीर्यापासून बनलेला (स्थूल) देह हा अन्नाच्या योगानेच वाढतो. तो अन्नमय कोश होय. तो (अन्नमय कोश हा) आत्मा (असू शकत) नाही; कारण अगोदर व नंतर त्या (देहा) चा अभाव असतो (६१).**

अन्नाने बनणारा आणि अन्नानेच वाढणारा स्थूल देह म्हणजेच अन्नमय कोश होय. आणि हा अन्नमय कोश हा आत्मा होऊ शकत नाही. याचे कारण असे :- स्थूल देह हा उत्पन्न होण्यापूर्वी अस्तित्वात नसतो; मरणोत्तर स्थूल शरीराचा नाश होत असल्याने, तो नंतर नसतो. म्हणजेच स्थूल देह हा नाशवंत, अनित्य आहे. याउलट आत्मा हा अविनाशी, नित्य आहे. म्हणून अनित्य असणारा असा हा स्थूल देह हा नित्य असणारा आत्मा असतच नाही.

* * *

प्राणमय कोशाचे वर्णन पुढील खंड ६२ मध्ये आहे.

(६२)

**पूर्णो देहे बलं यच्छन् अक्षाणां य: प्रवर्तक: ।**
**वायु: प्राणमयो नासावात्मा चैतन्य-वर्जनात् ।।६२।।**

देहात पूर्णपणे असून, सामर्थ्य देणारा व इंद्रियांचे प्रवर्तन करणारा वायु म्हणजे प्राणमय कोश होय; तो आत्मा नव्हे; कारण तो चैतन्यरहित आहे (६२).

पाच प्राणांच्या रूपाने वायु शरीरात सर्वत्र खेळत असतो. व्यान हा तर सर्व शरीर व्यापून असतो (खंड ४९ पहा). प्राणांच्या शक्तीमुळेच शरीराला बळ/सामर्थ्य प्राप्त होते. त्यांच्यामुळेच इंद्रियांचे कार्य चालते. कारण वारे जाऊन एकादे इंद्रिय लटके पडले तर ते इंद्रिय आपले कार्य करू शकत नाही. देहात प्राणरूपाने असणारा वायु म्हणजेच प्राणमय कोश होय. हा प्राणमय कोश म्हणजे आत्मा नव्हे. कारण प्राणवायूमध्ये चैतन्य नाही; तो जड / अचेतन आहे. याउलट आत्मा मात्र चित् / चैतन्यरूप / ज्ञानरूप आहे.

* * *

मनोमय कोशाची माहिती पुढील खंड ६३ मध्ये आहे.

(६३)

**अहन्तां ममतां देहे गेहादौ च करोति य: ।**
**कामाद्यवस्थया भ्रान्तो नासावात्मा मनोमय: ।।६३।।**

**देह आणि गेह (=घर) इत्यादींच्या ठिकाणी 'मी' व 'माझे' अशी (अभिमान-) वृत्ति जो धारण करतो, आणि इच्छा (काम) इत्यादींच्या अवस्थांमुळे जो भ्रांत झालेला असतो, तो मनोमय कोश होय. (परंतु) तो मनोमय कोश हाही आत्मा (असू शकत) नाही (६३).**

खंड ५२ मध्ये पाहिल्याप्रमाणे, मनोमय कोशात मन हे मुख्य आहे. ते नाना प्रकारचे संकल्प

व इच्छा करीत असते. या इच्छांच्या जाळ्यांत ते गुरफटले जाते आणि त्यामुळे ते आत्मज्ञानाच्या बाबतीत गोंधळून गेलेले असते. त्याला आत्म्याच्या सत्य स्वरूपाबद्दल भ्रांति असते.

खंड ४८ मध्ये पाहिल्याप्रमाणे अहंकाराचा समावेश मनातच होतो. म्हणून मनच अभिमान धारण करणारे होते असे येथे म्हटले आहे. " मी श्रीमंत आहे ", " मी उच्च पदस्थ आहे ", इत्यादि प्रकारचा अभिमान मन करते. तसेच देह, गेह, बायका, पोरे, जमीन, पैसा-अडका इत्यादि अनात्म पदार्थांवरही ते अभिमान बाळगते. त्यामुळे ते 'मी' व 'माझे' यांतच गुंतलेले असते.

या मनोमन कोशापेक्षा आत्मा वेगळा आहे. पण या विधानाचे कारण प्रस्तुत श्लोकात दिलेले नाही. ते कारण असे देता येते :- मन हे स्थूल शरीराप्रमाणेच अनित्य व जड / अचेतन आहे आणि प्राणाप्रमाणेच ते चैतन्यरहित आहे; म्हणून मनोमय कोश हा आत्मा नाही.

* * *

विज्ञानमय कोशाचे विवरण ६४ व्या खंडामध्ये आहे.

(६४)

लीना सुप्तौ वपुर्बोधे व्याप्नुयादानखाग्रगा।
चिच्छायोपेतधीर्नात्मा विज्ञानमयशब्दभाक् ।।६४।।

**चैतन्याच्या छायेने / प्रतिबिंबाने युक्त असणारी बुद्धि ही निद्रावस्थेत (सुप्तौ) लीन झालेली असते. (पण) जागृति अवस्थेत (बोधे) ती शरीरामध्ये (मस्तकापासून) नखाच्या टोकापर्यंत व्याप्त असते. ती बुद्धि विज्ञानमयकोश या शब्दाला पात्र होते. (तथापि हा विज्ञानमयकोश म्हणजेही) आत्मा नव्हे (६४).**

विज्ञानमयकोश या शब्दात 'विज्ञान' हा शब्द बुद्धि या अर्थी वापरलेला आहे. खंड ६० मध्ये पाहिल्याप्रमाणे, विज्ञानमयकोशात बुद्धि ही प्रधान आहे. ही बुद्धि प्रत्यक् चैतन्याच्या / अंतरात्म्याच्या संनिध आहे. तसेच तिच्यात सत्त्व या गुणाचे प्राबल्य असल्याने, ती स्वच्छ / निर्मल आहे. अशा या स्वच्छ बुद्धीत आत्मचैतन्याचे / प्रत्यक् चैतन्याचे प्रतिबिंब (छाया) पडते, व मग ती चेतन आहे असे भासू लागते. आरशात सूर्याचे प्रतिबिंब पडल्यावर ज्याप्रमाणे आरसा प्रकाशमय आहे असे वाटू लागते, त्याप्रमाणे चैतन्याच्या प्रतिबिंबाने युक्त असणारी बुद्धि चेतन आहे असे भासू लागते. बुद्धीतील हे चैतन्याचे प्रतिबिंब जागृति अवस्थेत सर्व शरीर - आनखशिखाग्र- व्यापून असते. पण निद्रा अवस्थेत बुद्धीचे कार्य थांबते. म्हणजेच बुद्धि ही निद्रा-अवस्थेत लीन होते, असे म्हणता येते.

चैतन्याचे प्रतिबिंब ग्रहण करणारी ही बुद्धि = विज्ञानमयकोश चिद्रूप आत्मा नव्हे हे अगदी स्पष्ट आहे.

* * *

आनंदमयकोशाचे विवेचन खंड ६५ मध्ये आहे.

(६५)

**काचिदन्तर्मुखा वृत्तिरानन्द-प्रतिबिंबभाक् ।**
**पुण्यभोगे भोगशान्तौ निद्रारूपेण लीयते ॥६५॥**

**पुण्यकर्मांचा उपभोग घेताना कोणतीतरी एक अंतर्मुख असणारी वृत्ति ही आनंदाचे प्रतिबिंब धारण करते, आणि भोग संपल्यावर (ती) निद्रारूपाने लीन होते (तिलाच आनंदमय कोश म्हणतात) (६५).**

जागृति अवस्थेत इंद्रिये, मन व बुद्धि कार्यप्रवण असल्याने, जाणीवपूर्वक आनंदाचा उपभोग घेता येतो. स्वप्नावस्थेत मन व बुद्धि हे कार्यशील असल्याने, आनंदाचा उपभोग घेता येतो. आता निद्रावस्थेत आनंद होतो याची जाणीव त्यावेळी नसते, पण त्याची स्मृति जागृति अवस्थेत होते. त्यामुळे निद्रा अवस्थेतसुद्धा कोणती तरी अंतर्मुख वृत्ती असते असे येथे म्हटले आहे. या वृत्तीमध्ये (आत्म्याच्या) आनंदाचे प्रतिबिंब पडते. जागृति व स्वप्न या अवस्थांतील भोग संपल्यावर ही वृत्ति निद्रारूपाने लीन होते. तिच्यात आनंदरूप आत्म्याचे प्रतिबिंब असल्याने, तेथे आनंद असतो. निद्रावस्थेत जाणीव / ज्ञान नसते; तेथे अज्ञान असते व आनंद असतो. अज्ञानालाच[१] आनंदमय कोश म्हणतात.

निद्रावस्थेतील आनंदाच्या संदर्भात वेदान्तसार हा ग्रंथ असे सांगतो :- सुषुप्ति अवस्थेत अज्ञानाच्या सूक्ष्म वृत्ति या आत्मचैतन्याने प्रदीप्त होतात; त्या वृत्तींच्या द्वारे ईश्वर व प्राज्ञ हे आनंदाचा[२] अनुभव घेतात. आणि झोपेतून उठल्यावर, " मी आनंदाने झोपलो होतो " असा आपला अनुभव असतोच. याच संदर्भात प्राज्ञ (आत्मा) हा आनंद अनुभवतो "(आनंदभुक् प्राज्ञ:)", असे मांडूक्य उपनिषद् सांगते.

---

१. पहा :- ईश्वराची अज्ञानसमष्टि व प्राज्ञची अज्ञानव्यष्टि यांनाच आनंदमयकोश म्हणतात :- ईश्वरस्य इयं समष्टि: ...आनंदमयकोश:; अस्यापि इयं (अज्ञानव्यष्टि:) आनंदमयकोश: (वेदान्तसार)

२. तदानीं एतौ ईश्वरप्राज्ञौ चैतन्यप्रदीप्ताभि: अतिसूक्ष्माभि: अज्ञानवृत्तिभि: आनंदं अनुभवत: । (वेदान्तसार)

" प्राण्याच्या शरीरातील गुहेत आत्मा आहे " ( आत्मास्य जन्तोर्निहितो गुहायाम् ।) असे कठ उपनिषद् (१.२.२०) सांगते. ही गुहा म्हणजेच पाच कोषांची परंपरा आहे असे पुढील ६६ वा खंड सांगतो.

(६६)

**देहादभ्यन्तरं प्राण: प्राणादभ्यन्तरं पुन: ।**
**तत: कर्ता ततो भोक्ता गुहा सेयं परंपरा ॥६६॥**

**देहाच्या आत प्राण, तसेच पुन: प्राणाच्या आत, नंतर कर्ता, त्यानंतर भोक्ता; अशी ही परंपरा म्हणजे गुहा आहे (६६).**

येथे पाच कोशांच्या परंपरेला गुहा म्हटले आहे की ज्या गुहेत अंतरात्मा दडून राहिलेला असतो. ' देहाच्या आत प्राण ' म्हणजे अन्नमय कोशाच्या आत प्राणमय कोश आहे. या श्लोकात प्राणानंतर मनोमय कोश सूचित करणारा ' मन: ' असा शब्द नाही. तसा तो घेतल्यास 'प्राणादभ्यन्तरं पुन:' याचे ऐवजी 'प्राणादभ्यंतरं मन:' असा पाठ होईल. तोच पाठ योग्य वाटतो. तेव्हा प्राणमय कोशानंतर मनोमय कोश असा अर्थ होईल. मनोमय कोशानंतर 'कर्ता' या शब्दाने विज्ञानमय कोश सूचित होतो. खंड ५२ मध्ये 'ज्ञानमयो ज्ञानशक्तिमान् कर्तृरूप:' असे त्याला म्हटले आहे. म्हणजे विज्ञानमयकोश हा कर्ता आहे. त्यानंतर येणारा भोक्ता हा शब्द आनंदमयकोश सूचित करतो. खंड ६५ मध्ये पाहिल्याप्रमाणे ईश्वर आणि प्राज्ञ आत्मा हे भोक्ता आहेत; आणि ते निद्राअवस्थेत असतात. अज्ञान / कारणदेह या उपाधीने निद्रा अवस्था येते. आणि अज्ञानालाच आनंदमयकोष म्हणतात.

अशा प्रकारे अन्नमयकोश, प्राणमयकोश, मनोमयकोश, विज्ञानमयकोश व आनंदमयकोश हे एकानंतर एक असल्याने, त्यांची परंपरा आहे. ही पाच कोषांची परंपरा म्हणजेच गुहा. गुहेत दडलेली वस्तु चटृदिशी कळून येत नाही. त्याप्रमाणे पाच कोषांच्या आवरणाखाली झाकलेला आत्मा सहजासहजी कळून येत नाही.

* * *

जे पाच कोष खंड ६१ ते ६५ मध्ये पद्यांमध्ये सांगितले आहेत, त्यांचेच गद्यातील विवेचन पुढील ६७ ते ७२ या खंडांत आहे. त्यातील अन्नमय कोशाचे स्वरूप व कार्य पुढील खंड ६७ मध्ये सांगितले आहे.

(६७)

**स्थूलशरीरं अन्नमयकोष:। मातापितृभ्यां अन्ने भुक्ते सति शुक्रशोणिताकारेण परिणतं तयो: संयोगादेव देहाकारेण परिणमते। कोषवद् आच्छादकत्वात् कोष इत्युच्यते। अन्नविकारत्वे सति आत्मानं आच्छादयति। कथम्। अपरिच्छिन्नं आत्मानं परिच्छिन्नमिव, जन्मादिषड्भाव-विकार-रहितं आत्मानं जन्मादि-षड्भाववन्तमिव, तापत्रयादि-रहितं आत्मानं तापत्रयवन्तमिव आच्छादयति। यथा कोष: खड्गं आच्छादयति यथा तुष: तण्डुलं आच्छादयति यथा वा गर्भं जरायुरावरयति, तथा ॥६७॥**

**स्थूल शरीर म्हणजे अन्नमय कोश होय. आईबापांनी अन्न खाल्ल्यावर, ते अन्न (त्यांच्या) शुक्र व शोणित या रूपात परिणत होते; नंतर त्यांच्या संयोगानेच (ते अन्न) देहाच्या स्वरूपात परिणत होते. कोषाप्रमाणे (=आच्छादनाप्रमाणे, आवरणाप्रमाणे) ते (स्थूल शरीर आत्म्याला) आच्छादक असल्याने, (अन्नाने बनलेल्या शरीराला) कोष असे म्हटले जाते. (स्थूल शरीर हे) अन्नाचा विकार/परिणाम असून, ते आत्म्याला झाकून टाकते. (प्रश्न :-) कसे बरे ? (उत्तर :-) (स्थूल शरीर आत्म्याला झाकते याचा अर्थ असा :-) अमर्याद असणाऱ्या आत्म्याला जणु मर्यादा असल्याप्रमाणे, (उत्पन्न झालेल्या) पदार्थांचे जन्म इत्यादि सहा विकार नसणाऱ्या आत्म्याला (ते) जन्म इत्यादि सहा विकार जणु असल्याप्रमाणे, त्रिविध ताप नसणाऱ्या आत्म्याला जणु ताप-त्रयाने युक्त असल्याप्रमाणे (ते स्थूल शरीर आत्म्याचे मूळ रूप) आच्छादित करते. जसे :- म्यान तरवारीला झाकते, तूस तांदळालाआच्छादिते, किंवा गर्भावरील आवरण गर्भाला आवरण घालते (तद्वत्) (६७).**

अन्नापासून परंपरेने उत्पन्न होणारे व पुढे अन्नाने वाढणारे माणसाचे इंद्रियगम्य स्थूल शरीर म्हणजेच अन्नमय कोश होय. ते कोषाप्रमाणे आत्म्याला झाकून टाकते. हे विधान पुढील दोन अर्थांनी घेता येते :- (१)स्थूल शरीर आत्म्याची उपाधि बनते. घट, मठ इत्यादि उपाधींनी ज्याप्रमाणे आकाश मर्यादित झाल्यासारखे वाटते, त्याप्रमाणे स्थूल देहाच्या उपाधीमुळे, अमर्यादित असणारा आत्मा हा जणु स्थूल शरीरात मर्यादित झाला असे वाटू लागते. तसेच स्थूल देह म्हणजेच आत्मा असे वाटू लागल्याने, स्थूल देहाचे जे जन्म इत्यादि सहा विकार आहेत, ते विकाररहित आत्म्यालाही आहेत असे वाटू लागते (पदार्थांच्या सहा विकारांसाठी खंड ३९ पहा). स्थूल शरीराचे बाबतीत त्रिविध ताप आहेत (त्रिविध तापांसाठी खंड ४३ पहा). स्थूल शरीर म्हणजेच आत्मा असे मानल्याने, हे त्रिविध तापही तापरहित आत्म्याला होतात असे वाटू लागते. हे सर्व स्थूल देहाच्या उपाधीमुळे भासू लागते. (२) एकादी वस्तु दुसऱ्या वस्तूने झाकली म्हणजे ते आवरण आहे तोपर्यंत त्या आच्छादित वस्तूचे नीटसे ज्ञान होत नाही. जसे :- म्यानाने तरवार

झाकली, तुसाने तांदूळ झाकले, किंवा गर्भावरणाने गर्भाला झाकले की ते ते झाकलेले पदार्थ नीटसे कळत नाहीत. ते आच्छादन नष्ट झाले वा बाजूला सारले तर आतल्या पदार्थांची नीट ओळख होते. त्याप्रमाणे स्थूल देहाने आत्म्याला झाकले की आत्मा कळेनासा होतो. स्थूल देहाच्या निरासानंतरच आत्मवस्तु कळते.

* * *

प्राणमयकोश व त्यांचे कार्य खंड ६८ मध्ये सांगितलेले आहे.

(६८)

**प्राणमयकोशो नाम कर्मेन्द्रियाणि पंच प्राणादिवायव: पंच, एतत् सर्वं मिलितं सत्, प्राणमयकोष इत्युच्यते। प्राणविकारे सति वक्तृत्वादिरहितं आत्मानं वक्तारं इव, दानादिरहितं आत्मानं दातारं इव, गमनादिरहितं आत्मानं गन्तारं इव, क्षुत्पिपासादि - रहितं आत्मानं क्षुत्पिपासावन्तं इव आवारयति ।।६८।।**

**प्राणमय कोष म्हणजे :- पाच कर्मेंद्रिये व प्राण इत्यादि पाच वायु , हे सर्व एकत्र मिळाले असता, त्यांना प्राणमय कोष असे म्हटले जाते. (हा प्राणमय कोष आत्म्याला पुढीलप्रमाणे झाकतो :-) प्राणाचा विकार आणि कार्य झाले असताना, वक्तृत्व इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला जणु वक्ता असल्याप्रमाणे , दान (तसेच देण्याची क्रिया यांनी) रहित असणाऱ्या आत्म्याला जणु दाता (तसेच देण्याची क्रिया करणारा) असल्याप्रमाणे, गमन इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला जणु गमन करणारा (गन्ता) असल्याप्रमाणे, तहानभूक इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला जणु तहानभूक असल्याप्रमाणे (दाखवून हा प्राणमय कोश आत्म्यावर) आवरण घालतो (६८).**

प्राणमय कोष हा आत्म्याला झाकतो याचा अर्थ असा :- प्राणमय कोश हा आत्म्याची उपाधि बनतो आणि प्राणमयकोश म्हणजेच आत्मा असे मानले जाऊ लागल्याने, प्राणमय कोशाचे स्वरूप आणि क्रिया यांचा अध्यास / आरोप आत्म्यावर केला जाऊ लागतो व आत्मा हा प्राणमय कोशापेक्षा वेगळा आहे, हे कळेनासे होते. जसे :- वाचा हे कर्मेंद्रिय बोलण्याची क्रिया करते. वाचेवर आत्म्याचा आरोप केला गेल्यावर, आत्मा बोलतो असे म्हटले जाते. हात हे कर्मेंद्रिय दानाची तसेच देण्याघेण्याची क्रिया करते. पाय हे कर्मेंद्रिय गमन-आगमन या क्रिया करते. परंतु त्यांनाच आत्मा मानले गेल्याने, त्यांच्या क्रियांचा आरोप आत्म्यावर केला जातो व आत्मा हा दाता, गन्ता आहे असे म्हटले जाते. तहान,भूक इत्यादि प्राणांची कार्ये आहेत. प्राणांवर आत्म्याचा आरोप

करून , ती कार्ये आत्म्याची आहेत असे म्हटले जाऊ लागते. संक्षेपाने, अशाप्रकारे प्राणमय कोशावर आत्म्याचा अध्यास झाल्यामुळे निष्क्रिय / क्रियारहित असणारा आत्मा हा क्रियाशील आहे असे वाटू लागते. थोडक्यात सांगायचे झाल्यास, प्राणमय कोशामुळे, त्याच्यापेक्षा वेगळा असणारा आत्मा कळून येण्यात बाधा निर्माण होते.

* * *

मनोमयकोश व त्याचे कार्य यांचा उलगडा खंड ६९ करतो.

(६९)

**मनोमयकोषो नाम ज्ञानेन्द्रियाणि पंच मनश्च, एतत् सर्वं मिलित्वा मनोमयकोष इत्युच्यते । कथम् । मनोविकारे सति संशयादिरहितं आत्मानं संशयवन्तं इव, शोकमोहादिरहितं आत्मानं शोकमोहादिमन्तं इव, दर्शनादिरहितं आत्मानं दर्शनादिमन्तं इव आवारयति ।।६९।।**

**मनोमय कोष म्हणजे :- पाच ज्ञानेंद्रिये आणि मन, हे सर्व मिळून होणाऱ्या समूहाला मनोमय कोष असे म्हटले जाते. (प्रश्न :- हा मनोमय कोश आत्म्याला) कसे बरे (झाकतो)? (उत्तर:-) मनाचे विकार व कार्य झाले असताना, संशय इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला जणु संशयाने युक्त असल्याप्रमाणे, शोक -मोह इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला जणु शोक -मोह इत्यादींनी युक्त असल्याप्रमाणे, दर्शन (=पहाणे, पाच ज्ञानेंद्रियांमार्फत होणारे प्रत्यक्ष ज्ञान) इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला दर्शन इत्यादींनी युक्त असल्याप्रमाणे (दाखवून हा मनोमय कोष आत्म्याला) आच्छादून टाकतो (६९).**

मनोमय कोष हा आत्म्याला झाकतो याचा अर्थ असा :- मनोमय कोष हा आत्म्याची उपाधि बनतो आणि त्या उपाधीवर आत्म्याचा अध्यास / आरोप केला जातो. त्यामुळे मनोमय कोषापेक्षा वेगळा असणारा आत्मा कळून येत नाही. जसे :- संशय इत्यादि मनाच्या क्रिया आहेत. शोक -मोह इत्यादि मनाचे विकार आहेत. त्यांचा आरोप आत्म्यावर होऊन, आत्मा जणु संशय घेतो, आत्म्याला जणु शोक-मोह इत्यादि विकार होतात, असे मानले जाऊ लागते. उदा. मी दु:खी आहे. मला त्या व्यक्तीबद्दल संशय वाटतो, असे म्हटले जाऊ लागते. तसेच :- पाच ज्ञानेंद्रियांच्या द्वारे होणारे बाह्य विषयांचे ज्ञान जणु आत्मा करून घेतो असे वाटू लागते. उदा. मी चंद्र पहातो; मी भजन ऐकतो; इत्यादि. अशाप्रकारे मनोमय कोशाच्या उपाधि-अंती आत्म्याचे स्वतंत्र निराळे अस्तित्व कळून येईनासे होते. याचाच अर्थ मनोमय कोष आत्म्याला आच्छादन घालतो.

* * *

विज्ञानमयकोश म्हणजे काय हे खंड ७० मध्ये सांगितले आहे.

(७०)

**विज्ञानमयकोषो नाम ज्ञानेन्द्रियाणि पंच बुद्धिश्च, एतत् सर्व मिलित्वा विज्ञानमयकोष इत्युच्यते। कर्तृत्व-भोक्तृत्वाद्यभिमानेन इहलोक-परलोक-गामी व्यावहारिको जीव इत्युच्यते ॥७०॥**

**विज्ञानमय कोष म्हणजे :- पाच ज्ञानेंद्रिये आणि बुद्धि, हे सर्व मिळून (होणाऱ्या समूहाला) विज्ञानमयकोष असे म्हटले जाते. (हा विज्ञानमय कोषच) कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादींचा अभिमान बाळगणारा असल्यामुळे, इहलोकी व परलोकी गमन करणारा असा तो होतो; त्यालाच (आपल्या नेहमीच्या लौकिक) व्यवहारात जीव असे म्हटले जाते (७०).**

विज्ञानमयकोषाची उपाधि लागलेला आत्मा हा जीवात्मा म्हणून गणला जाऊ लागतो. अशाप्रकारे विज्ञानमय कोषाची उपाधि ही आत्म्याचे मूळ स्वरूप झाकून टाकून, त्याला जीव या वेगळ्या स्वरूपात भासवू लागते. पारमार्थिक दृष्ट्या जीव म्हणून आत्म्यापेक्षा कोणी वेगळा नाही; तथापि आत्म्याला आलेली विज्ञानमय कोषाची उपाधि आत्म्याला जीव या स्वरूपात दाखवू लागते. म्हणून लौकिक व्यवहारात विज्ञानमय कोषालाच जीव म्हटले जाते.

विज्ञानमयकोषात बुद्धि हा घटक प्रधान आहे. या बुद्धीमध्ये आत्मचैतन्याचे प्रतिबिंब उमटते (खंड ६४ पहा). बुद्धीतील या चैतन्याच्या प्रतिबिंबामुळेच विज्ञानमयकोष हा जीव संज्ञेला पात्र होतो.

विज्ञानमयकोषाची उपाधि लागलेला आत्मा म्हणजेच जीव हा 'मी कर्ता आहे', 'मी भोक्ता आहे', अशाप्रकारचा अभिमान बाळगू लागतो. मग हा अभिमान / अहंकार बाळगून केलेल्या कर्मांचा फलभोग घेण्यास त्याला परलोकी व इहलोकी गमन-आगमन करावे लागते. म्हणून तथाकथित जीव हा संसारी / संसरण करणारा म्हणजे जन्ममरणाच्या चक्रात सापडलेला आहे असे वाटू लागते. हे सर्व घडते याचे कारण आत्मा हा विज्ञानमय कोषाकडून झाकला जातो.

* * *

विज्ञानमय कोषाचे कार्य पुढील खंड ७१ मध्ये सांगितले आहे.

(७१)

**विज्ञानविकारत्वे सति अकर्तारमात्मानं कर्तारमिव, अविज्ञातारमात्मानं विज्ञातारमिव, निश्चयरहितमात्मानं निश्चयवन्तमिव, जाड्यादिरहितं आत्मानं जाड्यादिमन्तमिव आवारयति ॥७१॥**

**विज्ञानाचे / बुद्धीचे विकार / परिणाम (=कार्ये) घडले असताना, अकर्ता असणाऱ्या आत्म्याला जणु कर्ता असल्याप्रमाणे, विज्ञाता नसणाऱ्या आत्म्याला जणु विज्ञाता असल्याप्रमाणे, निश्चयरहित आत्म्याला जणु निश्चयाने युक्त असल्याप्रमाणे, जडत्व इत्यादींनी रहित असणाऱ्या आत्म्याला जणु जडत्व इत्यादि असल्याप्रमाणे (दाखवून तो विज्ञानमयकोष आत्म्याला) झाकतो (७१).**

विज्ञानमयकोषात विज्ञान म्हणजे बुद्धि ही प्रधान आहे. तीच कर्ता, भोक्ता, विज्ञाता, निश्चयात्मिका, जड इत्यादि आहे. परंतु विज्ञानमय कोशाची उपाधि आत्म्याला आली. अध्यासामुळे विज्ञानाचे हे सर्व गुण आत्म्यावर आरोपित केले जातात. आणि आत्मा हा जणु कर्ता, भोक्ता, विज्ञाता, निश्चय करणारा, जड इत्यादि आहे असे वाटू लागते. ' मी कर्ता आहे, भोक्ता आहे, ज्ञाता आहे, मी निश्चय करतो ', असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा तेथे बुद्धीची कार्ये व गुण हे आत्म्यावर आरोपित असतात. ' मी जड आहे, मी मूर्ख आहे 'असे जेव्हा आपण म्हणतो, तेव्हा जडत्वाचा आरोप आत्म्यावर केलेला असतो.

शंका :- येथे 'आत्मा विज्ञाता नाही' (अविज्ञातारम्) असे म्हटले आहे. पण हे विधान, " विज्ञातारं अरे केन [१] विजानीयात् " (बृहदारण्यक उपनिषद्, २.४.१४) या वेदवचनाच्या विरुद्ध जाते. हे कसे काय ? या शंकेचे समाधान असे :- आत्मा हा सर्वसाक्षी आहे असे उपनिषदाला सांगावयाचे आहे. प्रस्तुत खंडात विज्ञाता शब्दाचा अर्थ ' लौकिक दृष्ट्या बाह्य विषय जाणून घेणारा' असा अभिप्रेत आहे; त्या दृष्टीने आत्मा तसा नाही. म्हणून त्याला येथे अविज्ञाता असे म्हटले आहे.

* * *

आनंदमयकोषाचे स्वरूप व कार्य पुढील खंड ७२ मध्ये सांगितले आहे.

(७२)

**आनन्दमयकोषो नाम प्रिय-मोद-प्रमोद-वृत्तिमद् अज्ञान-प्रधानं अंत:करणं आनन्दमयकोष इत्युच्यते। कथम्। प्रिय-मोद-प्रमोद-रहितं आत्मानं प्रिय-मोद-प्रमोदवन्तमिव, अभोक्तारमात्मानं भोक्तारमिव, परिच्छिन्न-सुख-रहितमात्मानं परिच्छिन्नसुखवन्तमिव आच्छादयति। इष्ट-पुत्रादि-दर्शनजं प्रियम् । प्रियलाभनिमित्तो हर्षो मोद:। स एव च प्रकृष्टो हर्ष: प्रमोद: ॥७२॥**

**आनंदमयकोष म्हणजे :- प्रिय, मोद आणि प्रमोद या वृत्तींनी युक्त असणारे व ज्यात अज्ञान प्रधान आहे, असे अंत:करण; त्यालाच आनंदमय कोष असे म्हटले जाते.**

१. अरे, विज्ञाता अशा आत्म्याला कशाने बरे जाणता येईल ?

(प्रश्न :- हा कोष आत्म्याला ) कसा बरे (झाकतो) ? (उत्तर :-) प्रिय, मोद व प्रमोद यांनी रहित असणाऱ्या आत्म्याला प्रिय, मोद व प्रमोद यांनी जणु युक्त असल्याप्रमाणे , भोक्ता नसणाऱ्या आत्म्याला जणु भोक्ता असल्याप्रमाणे, मर्यादित सुख नसणाऱ्या आत्म्याला जणु मर्यादित सुख असल्याप्रमाणे (दाखवून हा आनंदमयकोष आत्म्याला) आच्छादून टाकतो. (येथे) प्रिय म्हणजे इष्ट किंवा इष्ट असणारे पुत्र इत्यादि, त्यांना पाहिल्यावर होणारे सुख. प्रिय गोष्टींची प्राप्ति झाल्याकारणाने होणारा हर्ष म्हणजे मोद. आणि तोच हर्ष पुष्कळ (प्रकृष्ट) झाला की तोच प्रमोद होतो (७२).

ज्यात अज्ञान हेच मुख्य आहे असे अंत:करण म्हणजे आनंदमयकोष. म्हणजे जेथे मन व बुद्धि हे कार्यप्रवण नसून अज्ञान हेच मुख्य आहे असे अंत:करण म्हणजे आनंदमयकोष होय; तेथे मोद, प्रमोद, प्रिय यांच्या वृत्ति उठत असतात; या अज्ञानाच्या सूक्ष्म वृत्ति असतात (खंड ६५ पहा). आनंदमयकोषात सुख आहे; ते प्रिय, मोद, प्रमोद या स्वरूपाचे आहे; ते कोणत्यातरी विषयाशी निगडित आहे. म्हणून आनंदमयकोषातील आनंद / सुख आत्म्याच्या आनंदापेक्षा वेगळे ठरते; कारण आत्म्याचा आनंद हा कोणताही विषय नसताना असतो. निर्विषय आनंद म्हणजे ब्रह्मानंद किंवा आत्मानंद.

या आनंदमय कोशाची उपाधि आत्म्याला आली की तेथे अध्यास होऊन, प्रिय, मोद, प्रमोद, भोक्तृत्व, मर्यादित सुख या आनंदमयकोषाच्या गुणधर्मांचा आरोप आत्म्यावर होऊ लागतो. आणि आत्म्याचे स्वरूप झाकोळले जाते. अशाप्रकारे आनंदमयकोश आत्म्याला आच्छादून टाकतो.

* * *

प्राणमयकोष, मनोमयकोष व विज्ञानमयकोष यांत असणारा विशिष्ट संबंध पुढील खंड ७३ मध्ये सांगितला आहे.

(७३)

**एतेषु कोषेषु मध्ये विज्ञानमयो ज्ञानशक्तिमान् कर्तृरूप: । मनोमय इच्छाशक्तिमान् करणरूप: । प्राणमय: क्रियाशक्तिमान् कार्यरूप: । तत्र हेतुमाह :- योग्यत्वादेवमेतेषां विभाग इति वर्णयन्ति । एतत् कोषत्रयं मिलितं सूक्ष्मशरीरं इत्युच्यते । समष्टि -व्यष्टी शास्त्रान्तराद् विशेषतो ज्ञेये ।।७३।।**

**या (पाच) कोषांमध्ये , विज्ञानमय कोष हा ज्ञानशक्तीने युक्त असून, तो कर्ता या स्वरूपाचा आहे. मनोमय कोष हा इच्छाशक्तीने युक्त असून, तो करण /साधन या स्वरूपाचा आहे. प्राणमयकोष हा क्रियाशक्तीने युक्त असून, तो (प्रत्यक्ष) कार्य या स्वरूपाचा आहे. या बाबतीत (म्हणजे असा विभाग करण्याचे) कारण ग्रंथकार सांगतो (ते असे :-) या (कोषां)च्या**

**सामर्थ्याला / कार्याला / स्वरूपाला / योग्यतेला अनुसरून, (हे) विभाग (केले जातात), असे (शहाणे लोक) वर्णन करतात. (विज्ञानमय, मनोमय व प्राणमय या) तीन कोषांचा जो समूह त्याला सूक्ष्म शरीर असे म्हटले जाते. (या सूक्ष्म शरीराची अथवा स्थूल, सूक्ष्म व कारण या तीनही शरीरांची) समष्टि आणि व्यष्टि हे दोन्ही अन्य शास्त्रांवरून विशेष प्रकाराने जाणून घ्यावेत (७३).**

जे पाच कोष सांगितलेले आहेत, त्यांतील विज्ञानमय, मनोमय व प्राणमय या तीन कोषांत अनुक्रमे कर्ता, करण व कार्य / क्रिया असा संबंध आहे. या विधानाचा खुलासा मागे खंड ५२ खाली आलेला आहे. या तीन कोषांची जी तीन मुख्य कार्ये आहेत, त्या कार्यांना धरून असा विभाग केला गेला आहे, व त्यांच्यामध्ये असा संबंध मानला गेला आहे, असे शहाणे केवलाद्वैती तत्त्वज्ञ सांगतात.

विज्ञानमय, मनोमय व प्राणमय हे तीन कोष मिळून सूक्ष्म शरीर होते, हे मागे खंड ५२ मध्ये पाहून झाले आहे.

मागे खंड ५७ मध्ये व्यष्टि आणि समष्टि यांचा निर्देश आला होता. व्यष्टि व समष्टि हे दोन दृष्टिकोन आहेत. त्या दोन दृष्टिकोनांतून तीन शरीरे, तीन अवस्था इत्यादीकडे पहाता येते. त्यांचा अधिक खुलासा न करता, शंकराचार्य येथे सांगतात की तो खुलासा केवलाद्वैतावरील अन्य शास्त्रग्रंथातून जाणून घ्यावा ( हा खुलासा मागे खंड ३७ व ५९ खाली आलेला आहे). ग्रंथाचा अधिक विस्तार होऊ नये म्हणून शंकराचार्यांनी असे म्हटले असे दिसते.

* * *

तीन शरीरांपेक्षा आत्मा वेगळा आहे (खंड ३७ पहा) असे जे म्हटले होते, त्याचे अधिक स्पष्टीकरण पुढील खंड ७४ मध्ये आहे.

**(७४)**

**शरीरत्रयविलक्षणत्वमुच्यते। कथम्। सत्यस्वरूप: असत्यस्वरूपो न भवति। असत्यस्वरूप: सत्यस्वरूपो न भवति। ज्ञानस्वरूपो जडस्वरूपो न भवति। जडस्वरूप: ज्ञानस्वरूपो न भवति। एवं सुखस्वरूपो दु:खस्वरूपो न भवति। दु:खस्वरूप: सुखस्वरूपो न भवति ।।७४।।**

**(आत्मा हा) तीन शरीरांच्या समूहापेक्षा वेगळा आहे, हे आता सांगितले जात आहे. (प्रश्न:-) (आत्मा हा तीन शरीरांपेक्षा) कसा बरे (वेगळा आहे) ? (उत्तर :-) सत्यस्वरूप असणारा (आत्मा हा) असत्यस्वरूप असणारा होत नाही, आणि असत्यस्वरूप असणारा (अनात्मा=तीन देह) हा सत्यस्वरूप असणारा होत नाही. ज्ञानस्वरूप असणारा (आत्मा)**

**जडस्वरूप असणारा (अनात्मा) होत नाही, आणि जडस्वरूप असणारा (अनात्मा) ज्ञानस्वरूप असणारा (आत्मा) होत नाही. याचप्रमाणे सुख-स्वरूप असणारा (आत्मा) दु:खस्वरूप असणारा (अनात्मा) होत नाही, आणि दु:खस्वरूप असणारा (अनात्मा) हा सुखस्वरूप असणारा (आत्मा) होत नाही (७४).**

स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन शरीरांपेक्षा आत्मा हा विलक्षण आहे. विलक्षण म्हणजे अत्यंत वेगळे स्वरूप असणारा. शरीर-त्रय (=तीन शरीरे) म्हणजे अनात्मा असे खंड ३८ मध्ये म्हटले होते. तेव्हा आत्मा हा तीन शरीरापेक्षा वेगळा आहे याचा अर्थ तो अनात्मा-पदार्थांपेक्षा अगदी भिन्न स्वरूपाचा आहे. अनात्म्याचे स्वरूप हे अनृत, जड व दु:खात्मक आहे, असे खंड ३८ मध्ये सांगितले होते. साहजिकच अनात्म्यापेक्षा म्हणजे तीन देहांपेक्षा निराळा असणारा आत्मा हा अनृत, जड व दु:ख या स्वरूपाचा नाही. तो अनात्म्याच्या उलट स्वरूपाचा असा सत्य, ज्ञान व सुख या स्वरूपाचा आहे. म्हणून आत्मा हा सत्य-स्वरूप, ज्ञान-स्वरूप, आणि सुखस्वरूप आहे, असे येथे सांगितले आहे.

आता सत्य व असत्य / अनृत, जड आणि चेतन / ज्ञान, तसेच सुख व दु:ख हे परस्परविरोधी आहेत. जसे :- प्रकाश आणि अंधार; ते परस्परविरुद्ध असल्याने, प्रकाश हा कधीही अंधार होऊ शकत नाही, आणि अंधार हा केव्हाही प्रकाशस्वरूप होऊ शकत नाही. बरोबर याचप्रमाणे सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप आणि सुखस्वरूप असणारा आत्मा हा अनृतस्वरूप, जडस्वरूप आणि दु:खस्वरूप असणारा अनात्मा (=तीन देह) होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे अनृत-स्वरूप, जडस्वरूप आणि दु:खस्वरूप असणारा अनात्मा (=तीन देह) हाही सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप व सुखस्वरूप असणारा आत्मा होऊ शकत नाही. म्हणजेच आत्मा आणि अनात्मा (=तीन देह) हे कधीही एकाच स्वरूपाचे होऊ शकत नाहीत. अशाप्रकारे आत्मा हा अनात्म्यापेक्षा म्हणजेच स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरीरांपेक्षा संपूर्णपणे अगदी निराळे स्वरूप असणारा आहे.

* * *

आत्मा हा 'अवस्था-त्रय-साक्षी' आहे असे खंड ३७ मध्ये म्हटले होते. त्या तीन अवस्था कोणत्या ते आता पुढील खंड ७५ मध्ये सांगितले आहे.

(७५)

**एवं शरीरत्रयविलक्षणत्वमुक्त्वा अवस्थात्रयसाक्षित्वमुच्यते। कथम् । जाग्रदवस्था जाता जाग्रदवस्था भवति जाग्रदवस्था भविष्यति। स्वप्नावस्था जाता स्वप्नावस्था भवति स्वप्नावस्था भविष्यति। सुषुप्त्यवस्था जाता सुषुप्त्यवस्था भवति सुषुप्त्यवस्था भविष्यति। एवं अवस्थात्रयं अविकारतया जानाति ॥७५॥**

अशा प्रकारे (आत्मा हा ) तीन शरीरापेक्षा वेगळा आहे हे सांगून झाल्यावर, (आता तो आत्मा) तीन अवस्थांच्या समूहाचा साक्षी आहे हे आता सांगितले जात आहे. (प्रश्न :- तीन अवस्था कोणत्या व त्यांचा आत्मा साक्षी) कसा बरे आहे ? (उत्तर :- जागृति, स्वप्न व सुषुप्ति अशा तीन अवस्था असतात. त्यांच्या बाबतीत असे घडते :-) जागृति अवस्था ही (पूर्वी) निर्माण झाली होती; जागृत अवस्था (आत्ता) आहे; जागृत अवस्था ही (नंतर) येईल. स्वप्न-अवस्था ही (पूर्वी) उत्पन्न झाली होती; (आत्ता) स्वप्न-अवस्था आहे; (आणि भविष्यकाळात) स्वप्न-अवस्था येईल . (पूर्वी) सुषुप्ति अवस्था उद्भूत झाली होती; सुषुप्ति-अवस्था (आत्ता) आहे; सुषुप्ति-अवस्था (नंतर) येईल (म्हणजे या तीन अवस्था भूत, वर्तमान व भविष्य या तीन काळांत बदलत असतात. याउलट) आत्मा हा स्वत: अविकारी म्हणजे न बदलणारा राहून, या तीन अवस्थांच्या समुदायाला तो जाणत असतो (७५).

समष्टिरूप आणि व्यष्टिरूप असणाऱ्या स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरीरांच्या उपाधीअंती ज्ञानस्वरूप असणाऱ्या नित्य आत्म्याला तीन अवस्था / स्थिति प्राप्त होतात (खंड ७३ पहा). या तीन अवस्था म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति / निद्रा. जागृत अवस्थेत स्थूल देहाच्या अनुषंगाने शरीर, इंद्रिये, मन व बुद्धि हे कार्यप्रवण असतात. स्वप्न या अवस्थेत सूक्ष्म शरीराच्या अनुषंगाने मन व बुद्धि कार्यप्रवण असतात. सुषुप्ति अवस्थेत फक्त अज्ञान असते.

या तीन अवस्था अनित्य आहेत; त्या कायम टिकणाऱ्या नाहीत; त्या लागोपाठ बदलत असतात. जसे :- पूर्वी भूतकाळात जागृति अवस्था होती; नंतर स्वप्न व सुषुप्ति अवस्था आली. नंतर पुन: वर्तमान काळात जागृत अवस्था येते; त्यानंतर स्वप्न व सुषुप्ति अवस्था येतात. त्यानंतर भविष्यकाळात पुन: जागृत अवस्था येईल, व नंतर स्वप्न, सुषुप्ति येतील. हाच प्रकार स्वप्न व सुषुप्ति या अवस्थांच्या बाबतीत घडतो. याचा अर्थ असा की या तीन अवस्थांतील कोणतीही एक अवस्था सातत्याने टिकून रहात नाही; या अवस्था एकामागोमाग एक अशा येत-जात असतात.

या तीन अवस्थांना जाणणारा असा कोणीतरी आहे. या तीन अनित्य व बदलत्या अवस्थांना जाणणारा कोणीतरी नित्य पदार्थ / ज्ञाता हवा. तोच आत्मा होय. म्हणजे या तीनही अवस्थांत शुद्ध चैतन्य / आत्मा आहे तसाच रहातो. अवस्थांत बदल होतो, पण आत्म्यात कोणताही बदल / विकार होत नाही. या तीनही अवस्थांना जाणणारा, त्यांचा साक्षी / ज्ञाता / द्रष्टा असणारा असा जो कोणी आहे, तोच आत्मा आहे. तीन अवस्था व त्यांतील बदल हे सर्व जाणणारा व नित्य असणारा असा साक्षी आत्मा आहे.

* * *

आत्मा हा पाच कोषांपेक्षा वेगळा आहे असे खंड ३७ मध्ये सांगितले होते. त्याचा अधिक खुलासा आता खंड ७६ मध्ये केलेला आहे.

(७६)

अत आत्मन: पंचकोषविलक्षणत्वं दृष्टान्तरूपेण प्रतिपादयति ममेयं गौ: ममायं वत्स: ममायं कुमार: ममेयं कुमारी ममेयं स्त्री एवमादिपदार्थवान् पुरुषो न भवति। तेभ्यो विलक्षण:। तथा मम अन्नमयकोष: मम प्राणमयकोष: मम मनोमयकोष: मम विज्ञानमय-कोष: मम आनंदमयकोष:। एवं पंचकोषवान् आत्मा न भवति। तेभ्यो विलक्षण: साक्षी। 'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगंधवत् च यत्। अनाद्यनन्तं महत: परं ध्रुवं निचाय्य तं मृत्युमुखात् प्रमुच्यते ' इत्यादिश्रुते: ।।७६।।

म्हणून पाच कोषांपेक्षा आत्म्याचे जे वेगळे स्वरूप आहे, ते आता उदाहरणे देऊन ग्रंथकार प्रतिपादन करीत आहे. (आत्मेतर म्हणजे अनात्मा अशा बाह्य पदार्थांवर अहंकार बाळगून माणूस हा) 'हा माझा बैल / गाय, हे माझे वासरू, हा माझा कुमार / पुत्र, ही माझी कुमारी/पुत्री, ही माझी स्त्री / पत्नी '(असे लौकिक व्यवहारात म्हणत असतो; परंतु) अशाप्रकारच्या पदार्थांनी युक्त म्हणजे या पदार्थांचा स्वामी असा पुरुष (=आत्मा) असत नाही; तो त्यांच्यापेक्षा भिन्न स्वरूपाचा आहे. त्याचप्रमाणे (लौकिक व्यवहारात अहंकारामुळे मनुष्य म्हणतो) ' माझा अन्नमयकोष (=स्थूल देह) आहे; माझा प्राणमय कोष (= प्राण व कर्मेंद्रिये) आहे; माझा विज्ञानमयकोष (= मन व ज्ञानेंद्रिये) आहे; माझा आनंदमय कोष आहे.' (तथापि) अशा प्रकारच्या पाच कोषांनी युक्त असा आत्मा हा असत नाही, तर त्या (पाच कोशां) पेक्षा निराळे स्वरूप असणारा व त्यांचा साक्षी / द्रष्टा / ज्ञाता (असा आत्मा असतो. ही गोष्ट पुढील प्रकारच्या श्रुतीच्या वचनावरून कळून येते :- (ब्रह्मतत्त्व / आत्मतत्त्व हे) 'शब्दरहित, स्पर्शरहित, रूपरहित, व्यय/ नाश याने रहित, तसेच रस-रहित, नेहमीच गंधरहित, अनादि, अनंत, महत् (तत्त्वा)च्या पलीकडील आणि नित्य असे जे आहे, त्याला जाणून माणूस मृत्यूच्या मुखातून सुटतो ' (७६).

अन्नमयकोश म्हणजे स्थूल शरीर आहे (खंड ६७ पहा). प्राणमय, मनोमय व विज्ञानमय हे तीन कोश म्हणजे सूक्ष्म शरीर होय (खंड ५२, ७३ पहा). आनंदमय कोष म्हणजे कारणशरीर आहे (खंड ७२ पहा). तेव्हा पाच कोषांपेक्षा आत्मा वेगळा आहे याचाच पर्यायाने अर्थ असा आहे की आत्मा हा तीन शरीरापेक्षा संपूर्णपणे वेगळा आहे (खंड ७४ पहा).

मागे खंड ३७ खाली, अध्यारोपाच्या प्रक्रियेत पाहिल्याप्रमाणे, अपंचीकृत / सूक्ष्म अशा आकाश इत्यादि भूतांपासून स्थूल अशी आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी ही पाच महाभूते निर्माण होतात व त्या पंचमहाभूतांपासून विश्वातील सर्व अचेतन पदार्थ बनले आहेत.

आता ही पंचमहाभूते काय, सूक्ष्म पंचभूते काय, पाच कोष काय किंवा तीन शरीरे काय हे

सर्वच अनात्मा आहेत. आणि त्या अनात्म पदार्थापेक्षा आत्मा हा संपूर्णपणे भिन्न आहे. तथापि लौकिक व्यवहारात मात्र आत्मा व त्याचे धर्म आणि अनात्मा व त्याचे धर्म यांचा परस्परांवर अध्यास [१] केला जाऊन अहंकाराअंती माणूस 'मी, माझे' असे म्हणू लागतो. कारण त्या दोहोंतला फरक त्याला [२] कळलेला नसतो. केवलाद्वैतमतानुसार 'मी' या शब्दाने खरे म्हणजे आत्मा / अंतरात्मा /प्रत्यगात्मा सूचित होतो. त्याचा बाह्य तसेच आंतर पदार्थांशी काडीइतकाही संबंध नाही. परंतु हा विवेक नसल्याने, व्यवहारात आपण बाह्य तसेच आंतरिक पदार्थांना मी व माझे असे म्हणत राहतो. अविवेकजन्य अहंकारामुळे बाह्य पदार्थ व त्यांचे गुणधर्म आणि आंतर पदार्थ व त्यांचे गुणधर्म यांचा आरोप आपण आपल्या आत्म्यावर करतो :- पत्नी, पुत्र हे स्वस्थ / अस्वस्थ असतील तर आपण स्वस्थ / अस्वस्थ आहोत असे आपण मानतो. 'मी स्थूल आहे' या म्हणण्यात शरीराच्या धर्माचा आरोप आत्म्यावर होतो. 'मी पहातो, मी चालतो' अशाप्रकारच्या विधानात, इंद्रियांच्या धर्मांचा आरोप आत्म्यावर होतो. 'मी विचारी आहे', 'मी निश्चयी आहे', अशाप्रकारच्या म्हणण्यात मन व बुद्धि यांचा आरोप आत्म्यावर [३] असतो. अशाप्रकारे अहंकाराअंती आपण गाय / बैल, वासरू, पुत्री, पत्नी, पुत्र इत्यादि बाह्य पदार्थांना 'माझे' असे म्हणतो [४]. तसेच अन्य काही पदार्थांनाही आपण 'माझे' असे म्हणतो. उदा. माझा अन्नमय कोष. येथे अन्नमय कोष म्हणजे स्थूल शरीर आहे. तसेच माझा प्राण, माझे हातपाय; येथे प्राणमय कोषाला 'माझा' असे म्हटले आहे. माझे मन, माझा डोळा; येथे मनोमय कोषाला 'माझा' असे म्हटले आहे. माझी बुद्धि, माझे कान; येथे विज्ञानमय कोषाला माझा असे म्हटले आहे. माझी निद्रा या शब्दप्रयोगावरून आनंदमयकोष माझा आहे हे सुचविले जाते. व्यवहारात जरी असे घडत असले तरी आत्मा हा अनात्म पदार्थापेक्षा, तीन देहापेक्षा, पाच कोषापेक्षा अत्यंत वेगळा आहे, आत्मा त्या सर्वांचा साक्षी / द्रष्टा आहे (खंड १ पहा), असे मुमुक्षूने जाणून घ्यावयास हवे.

---

१. अंतरात्म्यावर केले जाणारे विविध आरोप म्हणजेच विशेष अध्यारोप होय.

२. पहा :- अन्योन्यस्मिन् अन्योन्यात्मकतां अन्योन्यधर्मांश्च अध्यस्य इतरेतर-अविवेकेन ........अहमिदं ममेदं इति........अयं लोकव्यवहार : । (ब्रम्हसूत्रावरील शंकराचार्यांचे अध्यासभाष्य).

३. पुत्र-भार्यादिषु विकलेषु सकलेषु वा अहमेव विकल: सकलो वेति बाह्यधर्मान् आत्मनि अध्यस्यति, तथा देहधर्मान् - स्थूलोऽहं कृशोऽहं गौरोऽहं तिष्ठामि गच्छामि लंघयामि च इति। तथा इंद्रियधर्मान्-मूक: काण: क्लीब: बधिर: अन्धोऽहं इति। तथा अंत:करणधर्मान् काम -संकल्प-विचिकित्सा -अध्यवसायादीन्। (ब्रह्मसूत्रावरील शंकराचार्यांचे अध्यासभाष्य)

४. येथे आणि एक गोष्ट लक्षात घ्यावी. 'माझा पुत्र' मध्ये 'माझा' असा षष्ठी विभक्तीचा प्रयोग आहे. हा प्रयोगच 'मी' व 'पुत्र' हे वेगळे आहेत असे दर्शवितो. कारण षष्ठी विभक्ति ही दोन भिन्न पदार्थांतील संबंध दाखवीत असते.

**आत्मानात्मविवेक:**

पाच महाभूतांच्या गुणधर्मांनी रहित असा आत्मा कसा आहे व त्याचे ज्ञान झाल्याने काय होते हे सांगणारे श्रुतीचे -कठ उपनिषदाचे (१.३.१५)- एक वचन शंकराचार्यांनी येथे उद्धृत केले आहे. त्यानुसार : आत्मा हा शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणांनी रहित आहे. आत्मा हा अव्यय/अविनाशी, अनादि, अनंत, नित्य इत्यादि आहे. अशा आत्म्याला / ब्रह्माला जाणल्याने माणूस मृत्यूच्या मुखातून सुटतो म्हणजे तो जन्ममरणाच्या चक्रातून सुटून मोक्ष प्राप्त करून घेतो.

* * *

आत्मा हा सच्चिदानंद या स्वरूपाचा आहे, असे खंड ३७ मध्ये सांगितले होते. त्याचे अधिक स्पष्टीकरण प्रस्तुत खंड ७७ मध्ये आहे.

(७७)

**इदानीं आत्मन: सच्चिदानंदस्वरूपत्वमुच्यते। सद्रूपत्वं नाम केनाप्यबाध्यमानत्वेन कालत्रये अपि एकरूपेण विद्यमानत्वमुच्यते। चिद्रूपत्वं नाम साधनान्तर-निरपेक्षतया स्वयं प्रकाशमान: सन् स्वस्मिन् आरोपितसर्वपदार्थावभासकवस्तुत्वं चिद्रूपत्वमित्युच्यते। आनंदस्वरूपं नाम परमप्रेमास्पदत्वं नित्यनिरतिशयत्वमानंदत्वमित्युच्यते। नित्यविज्ञानमानन्दं ब्रह्म राति दातु: परायणमिति श्रुते: ।।७७।।**

**आता आत्म्याचे सच्चिदानंदस्वरूप म्हणजे काय ते सांगितले जात आहे :- (आत्म्याचे) सद्रूप असणे म्हणजे :- कोणत्याही (अन्य) गोष्टीकडून बाध / निरास होत नसल्यामुळे तीनही काळांत एकाच रूपाने असणे; याला सद्रूपत्व असे म्हटले जाते. (आत्म्याचे) चिद्रूपत्व म्हणजे :- (प्रकाशित होण्यास) अन्य साधनांची अपेक्षा नसताना, स्वत:च प्रकाशमान राहून, स्वत:वर आरोपित केल्या जाणाऱ्या सर्व पदार्थांना प्रकाशित करणारी अशी वस्तु असणे, याला चिद्रूपत्व असे म्हटले जाते. (आत्म्याचे) आनंदस्वरूप म्हणजे :-परम / श्रेष्ठ प्रेमाचे आस्पद / आश्रयस्थान असून, नित्य व निरतिशय असणे, याला आनंदत्व असे म्हटले जाते; हे पुढील श्रुतिवचनावरूनही कळते :- नित्य, 'विज्ञान व आनंद असणारे ब्रह्म हे दात्याला श्रेष्ठ स्थान देते' (७७).**

आत्मा हा सच्चिदानंदस्वरूप आहे. म्हणजे तो सद्रूप, चिद्रूप, आणि आनंदरूप आहे. या तीन शब्दांचे स्पष्टीकरण असे :-

आत्मा सद्रूप आहे म्हणजे सत् हे आत्म्याचे स्वरूप आहे. सत् म्हणजे काय ? जे कशानेहि बाधित / निरस्त / नष्ट होत नाही, व जे भूत-वर्तमान-भविष्य या तीनही काळांत न बदलता एकाच रूपात रहाते, ते सत् होय. याचा अर्थ असा :- सत् ला उत्पत्ति नाही व नाश नाही, सत् मध्ये कोणताही विकार / फेरबदल होत नाही, सत् चा अन्य कशानेही नाश होत नाही, सत् हे अनादि व अनंत आहे, सत् हे कोणत्याही काळात नसते असे नाही, सत् हे सदोदित असतच असते.

## आत्मानात्मविवेक:

आत्मा चिद्रूप आहे म्हणजे चित् (=ज्ञान) हे आत्म्याचे स्वरूप आहे. या जगातील वस्तु प्रकाशित होण्यास म्हणजे ज्ञानाचा विषय होण्यास, प्रकाश, इंद्रिये इत्यादींची आवश्यकता असते, म्हणजेच त्यांचे ज्ञान होणे हे अन्य घटकांवर किंवा साधनांवर अवलंबून असते. याउलट आत्मा हा स्वयंप्रकाशी आहे; त्याचा प्रकाश (=ज्ञान) अन्य कोणत्याही गोष्टीवर अवलंबून नाही. सूर्याप्रमाणे आत्मा हा स्वयंप्रकाशी आहे. तसेच, सूर्य हा अन्य पदार्थांना प्रकाशित करतो; त्याप्रमाणे आत्माही करतो म्हणजे असे :- अज्ञानामुळे आत्म्यावर [१] जगातील सर्व वस्तूंचा आरोप / अध्यारोप होतो. या आरोपित पदार्थांना प्रकाशित करणारी वस्तु आत्मा आहे. म्हणजे आत्म्यामुळेच आरोपित पदार्थांचे ज्ञान होते. अशाप्रकारे आत्मा हा स्वत: प्रकाशमान, स्वयंप्रकाशी असून, तो इतर पदार्थांनाही प्रकाशित करणारा आहे.

आत्मा हा आनंदरूप आहे म्हणजे आनंद हे आत्म्याचे स्वरूप आहे. या जगात प्राणिमात्रांना जो आनंद मिळतो तो तात्पुरता / प्रासंगिक / क्षणिक असतो, तो अनित्य असतो; तसेच त्या आनंदात कमीजास्तपणा असतो. याउलट आत्मानंद हा नित्य आहे; त्यात काही कमीजास्तपणा नाही; तो अखंड आहे; त्या आनंदापेक्षा वरचढ आनंद अन्यत्र कुठेही नाही; म्हणून तो आनंद सर्वश्रेष्ठ आहे. आत्मा हा आनंदरूप आहे म्हणजे आत्मा हा (आपल्या) परमप्रेमाचे आश्रय-स्थान आहे; आत्मा हा आपणांस सर्वांत प्रिय किंवा प्रियतम आहे. आत्म्याने परमप्रेमाचे आश्रयस्थान असणे म्हणजेच आत्म्याने आनंदरूप असणे होय. या संदर्भात शंकराचार्य आपल्या सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह या ग्रंथात सांगतात :-"आत्मा हा परमप्रेमाचे आश्रयस्थान आहे; म्हणून तो [२] सुखरूप आहे. पुत्र, पैसा, पत्नी इत्यादि सर्वांपेक्षा आत्मा हा आपणास प्रिय आहे, प्रियतम आहे; प्राणधारी प्राण्यांना आत्मा [३] प्रियतम आहे. आता जी वस्तु प्रियतम असते, ती आनंददायक असते. आत्मा प्रियतम आहे म्हणून तो आनंददायक आहे, आत्मा हा आनंदरूप [४] आहे."

---

१. अधिष्ठानं परं ब्रह्म सच्चिदानंद -लक्षणम्। तत्राध्यस्तमिदं भाति नामरूपात्मकं जगत् ।। (शंकराचार्यकृत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, ८७९-८८०).

२. परमप्रेमास्पदत्वेन सुखरूपत्वमात्मनः। तत्रैव ६२३.

३. स्वात्मा प्रियतमः।६२५; एष एव प्रियतमः पुत्रादपि धनादपि।अन्यस्मादपि सर्वस्मात् ॥६२७ ; आत्मा खलु प्रियतमोऽसुभृताम्। तत्रैव ६२९.

४. तस्मादात्मा केवलानन्दरूपो यः सर्वस्माद् वस्तुनः प्रेष्ठ उक्तः। तत्रैव ६३१.

अशाप्रकारे, आत्मा हा सच्चिदानंद-स्वरूप आहे. त्यातील आत्मा हा सत् आहे हे स्पष्टच आहे. तो चिद्रूप व आनंदरूप आहे याला आधार म्हणून शंकराचार्यांनी वेदाचे - बृहदारण्यक उपनिषदाचे -एक वचन उद्धृत केले आहे ते असे : 'विज्ञानं आनंदं ब्रह्म' (३.९.२८). येथे ब्रह्म म्हणजे आत्मा आहे हे लक्षात घ्यावे. येथे पुढील गोष्ट लक्षात घ्यावी :- आत्मानात्मविवेक या ग्रंथाच्या संहितेमध्ये 'नित्यविज्ञानमानंदं' असे आहे. येथे 'नित्य' हा शब्द अवतरणातून बाजूला घ्यावयास हवा. कारण 'विज्ञानमानन्दं' इतकेच बृहदारण्यक उपनिषद् सांगते.

* * *

वरील खंड ७७ मध्ये आत्म्याचे स्वरूप स्पष्ट केले आहे. ते समजल्यावर 'मी ब्रह्म (=आत्मा) आहे', असा साक्षात्कार मुमुक्षूला होऊन, तो जीवन्मुक्त होतो, असे पुढील खंड ७८ मध्ये सांगितले आहे. येथे प्रश्न असा :- आत्म्याचे स्वरूप कळताच, आपण ब्रह्म आहोत हे शिष्याला लगेच कळते काय ? या प्रश्नाचे उत्तर असे आहे :- वर खंड ३७ खाली सांगितले होते की गुरु शिष्याला अध्यारोप [१] व अपवाद या प्रक्रिया सांगून झाल्यावर मग जीव व ब्रह्म हे एकच कसे हे स्पष्ट करण्यास, गुरु शिष्याला 'तत्त्वमसि' वाक्याचा सम्यक् अर्थ उलगडून दाखवितात. कारण तत्त्वमसि या वाक्यात तत् [२] आणि त्वं या पदांच्या अर्थांचे म्हणजेच जीव आणि ब्रह्म यांचे ऐक्य अभिप्रेत आहे. आणि असे असल्यामुळे येथे या वाक्याचा अर्थ संक्षिप्तपणे पहावयास हवा.

तत्त्वमसि [३] हे वाक्य छांदोग्य उपनिषदात (६.८.७) येते. आता, एकाद्या वाक्याचा अर्थ कळावयाचा असेल तर [४] त्यातील पदांचा / शब्दांचा अर्थ प्रथम कळला पाहिजे हे उघड आहे. म्हणून तत्त्वमसि वाक्यातील तत्, त्वम्, आणि असि या पदांचा अर्थ कळल्यावर, त्या वाक्याचा अर्थ [५] कळणार आहे.

शब्दाचा अर्थ सांगणाऱ्या अभिधा, लक्षणा आणि व्यंजना अशा तीन शक्ति आहेत. त्यांचे आधारे शब्दाचे वाच्यार्थ / मुख्यार्थ, लक्ष्यार्थ / लाक्षणिक अर्थ, आणि व्यंग्यार्थ हे तीन अर्थ अनुक्रमाने कळून येतात. यापैकी व्यंग्यार्थ हा काव्याच्या प्रांतात महत्त्वाचा आहे. तर लौकिक व्यवहार

---

१. अध्यारोपाचे संक्षिप्त विवरण खंड ३७ खाली, व अपवादाचे संक्षिप्त विवेचन खंड ५४ खाली आलेले आहे.

२. तत्त्वमो: पदयोरैक्यमेव तत्त्वमसीत्यलम् । शंकराचार्यकृत तत्त्वोपदेश, ४२

३. तत्त्वमसि वाक्याचा सविस्तर अर्थ शंकराचार्यकृत तत्त्वोपदेश, शंकराचार्यप्रणीत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, सदानंदकृत वेदान्तसार इत्यादि ग्रंथांत आलेला आहे. 'केवलाद्वैतमतानुसार तत्त्वमसि वाक्याचा अर्थ' या माझ्या लेखातही हा अर्थ सविस्तरपणे चर्चिला आहे. हा लेख जीवनविकास मासिकात ऑगस्ट २००० या अंकापासून येत आहे

४. हेतुः पदार्थबोधो हि वाक्यार्थावगतेरिह । शंकराचार्यकृत वाक्यवृत्ति, १०

५. शोधिते त्वंपदार्थे हि तत्त्वमस्यादिचिंतितम् । संभवेन्नान्यथा ॥ शंकराचार्यकृत तत्त्वोपदेश, २२

आणि शास्त्रग्रंथ यांत मात्र वाच्यार्थ व लक्ष्यार्थ हे दोनच अर्थ महत्त्वाचे आहेत. तत्त्वमसि वाक्याच्या बाबतीत व्यंग्यार्थाचा विचार करण्याचे कारण नाही; कारण ते उपनिषत्शास्त्रातील एक वाक्य आहे.

आता, वाच्यार्थ तो की जो एखादा शब्द ऐकताच / वाचताच तत्काल प्रतीतीला येतो. उदा. वृक्ष म्हटले की झाड हा अर्थ लगेच लक्षात येतो. म्हणून तो वृक्ष शब्दाचा वाच्यार्थ होय. आता, कधी कधी असे होते की वाच्यार्थ / मुख्यार्थ हा असंगत किंवा अनुपपन्न ठरतो. अशावेळी लक्षणा शक्तीचा [१] आश्रय घेऊन , लक्ष्यार्थाचा स्वीकार करावा लागतो. तथापि हा लक्ष्यार्थ वाच्यार्थाशी कोणत्या ना कोणत्यातरी प्रकारे संबंधित असावा लागतो. उदा. दारावरून मिरवणूक गेली, या वाक्यात दार शब्दाचा वाच्यार्थ अयोग्य ठरतो; कारण प्रत्यक्ष दारावरून मिरवणूक जाणे शक्य नाही. म्हणून येथे 'दाराच्या जवळून' असा लक्ष्यार्थ घेतला जातो.

वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांतील कोणता अर्थ तत्त्वमसि वाक्यात घ्यावा लागतो, याचा विचार आता केला आहे.

तत्त्वमसि वाक्यात तत्, त्वम् आणि असि अशी तीन पदे आहेत. त्यांतील 'असि '(= आहेस) हे क्रियापद असून, ते अस् धातूचे वर्तमानकाळी द्वितीय पुरुषाचे एकवचन आहे, आणि ते तत् आणि त्वम् या पदांच्या [२] अर्थांचे ऐक्य दाखविते. आणि अध्यारोपप्रक्रियेवरून कळून येणारे तत् आणि त्वम् या पदांचे वाच्यार्थ पुढीलप्रमाणे आहेत :- तत् म्हणजे ईश्वर-चैतन्य, आणि त्वं म्हणजे जीव-चैतन्य. ईश्वर-चैतन्य हे सर्वज्ञत्व इत्यादि गुणांनी युक्त आहे, आणि जीव-चैतन्य हे अल्पज्ञत्व इत्यादि गुणांनी युक्त आहे. म्हणून तत् म्हणजे सर्वज्ञत्वादि-विशिष्ट-चैतन्य आणि त्वं म्हणजे अल्पज्ञत्वादि-विशिष्ट-चैतन्य असे त्या शब्दांचे [३] वाच्यार्थ घेतले जातात. आता हे वाच्यार्थ जर तत्त्वमसि वाक्यात घेतले तर ते परस्परविरोधी असल्याने त्यांचे ऐक्य [४] हा अर्थ अशक्य होतो. म्हणजेच तत्त्वमसि वाक्यात तत् आणि त्वं पदांचा वाच्यार्थ अनुपपन्न / असंगत ठरतो. याचाच अर्थ असा की तत्त्वमसि वाक्यात तत् आणि त्वं पदांचे वाच्यार्थ घेतल्यास इष्ट वाक्यार्थ प्राप्त होत नाही. साहजिकच या परिस्थितीत या वाक्यात लक्षणेचा अंगीकार करावा लागतो.

---

१. मानान्तरविरोधे तु मुख्यार्थस्यापरिग्रहे । मुख्यार्थेनाविनाभूते प्रतीतिर्लक्षणोच्यते ॥ शंकराचार्यकृत वाक्यवृत्ति,४७

२. शंकराचार्यकृत स्वात्मनिरूपण, ३७

३. केवलाद्वैतावरील ग्रंथांत तत् व त्वं पदांचे वाच्यार्थ भिन्न पद्धतीने दिलेले दिसतात. उदा. स्वात्मनिरूपण, तत्त्वोपदेश, वेदान्तसार, इत्यादि. तरी वर दिलेले अर्थच संक्षिप्त व सोयीचे आहेत.

४. तादात्म्यमत्र वाक्यार्थस्तयोरेव पदार्थयो: । शंकराचार्यकृत वाक्यवृत्ति, ३७

तत्त्वमसि वाक्याचा अर्थ करताना, केवलाद्वैतवेदान्त जी लक्षणा स्वीकारतो तिला भाग-[1] लक्षणा असे म्हटले जाते. या भागलक्षणेप्रमाणे, शब्दाच्या वाच्यार्थाचा एक अंश सोडून दिला जातो आणि वाच्यार्थाचाच उरलेला अंश [2] लक्ष्यार्थ म्हणून घेतला जातो. या भागलक्षणेनुसार तत्त्वमसि वाक्यात असे घडते :- तत् पदाचा 'सर्वज्ञत्वादि-विशिष्ट' हा जो वाच्यार्थाचा अंश आहे, तो त्वं पदाच्या वाच्यार्थातील 'अल्पज्ञत्वादि-विशिष्ट ' या अंशाशी विरोधी असल्याने, तो सोडून दिला जातो आणि वाच्यार्थाचा उरलेला ' चैतन्य' हा अंश लक्ष्यार्थ म्हणून घेतला जातो. याचप्रमाणे त्वं पदाचा 'अल्पज्ञत्वादि-विशिष्ट ' हा जो वाच्यार्थाचा अंश आहे, तो तत् पदाच्या वाच्यार्थातील ' सर्वज्ञत्वादि -विशिष्ट ' या अंशाला विरुद्ध असल्याने सोडून दिला जातो, आणि वाच्यार्थाचा उरलेला 'चैतन्य' हा अंश लक्ष्यार्थ म्हणून घेतला जातो. अशा प्रकारे तत् पदाचा लक्ष्यार्थ ' चैतन्य' असा होतो, आणि त्वं पदाचा लक्ष्यार्थही ' चैतन्य' असाच होतो. हे दोन्हीही लक्ष्यार्थ एकच आहेत. म्हणजेच तत् व त्वं पदांच्या लक्ष्यार्थाचे ऐक्य आहे. याचाच व्यवहारातील अर्थ असा की जीव आणि ब्रह्म हे चैतन्य या दृष्टीने एकच आहेत. अशाप्रकारे भागलक्षणेच्या द्वारा तत्त्वमसि या वाक्यावरून जीव आणि आत्मा / ब्रह्म यांचे ऐक्य कळून येते.

* * *

जीव आणि ब्रह्म / आत्मा यांच्या ऐक्याचा साक्षात्कार मुमुक्षूला झाल्यावर काय होते, हे पुढील ७८ व्या खंडात सांगितले आहे.

(७८)

**एवं नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभावं ब्रह्म अहमस्मीति संशयासंभावनाविपरीतभावना- राहित्येन यस्तु जानाति स जीवन्मुक्तो भवति इति ॥७८॥**

**अशा प्रकारे नित्य, शुद्ध ,बुद्ध, मुक्त असा स्वभाव असणारे ब्रह्म (म्हणजे)' मी आहे' असे संशय, असंभव आणि विपरीत भावना यांनी रहित होऊन जो (मुमुक्षु) जाणतो, तो जीवन्मुक्त होतो (असे सांगितलेले आहे) (७८).**

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानात आत्मा म्हणजेच ब्रह्म आहे. हे ब्रह्म नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त आहे. म्हणजे असे :- ब्रह्माला उत्पत्ति आणि नाश नाही; ते तीनही काळांत न बदलता तसेच रहाणारे सत् आहे; म्हणूनच ते नित्यनिरंतर आहे. जगात आढळणारा कोणताही विकार, दोष, मल

---

१. या भागलक्षणेला भागत्यागलक्षणा, जहदजहल्लक्षणा, जहत्यजहतीलक्षणा अशी अन्य नावेही आहेत.

२. वाच्यार्थस्यैकदेशं च परित्यज्यैकदेशकम् । या बोधयति सा ज्ञेया तृतीया भागलक्षणा ।। शंकराचार्यकृत तत्त्वोपदेश, ३७

इत्यादि ब्रह्मात नसल्याने, ते निर्दोष, निर्मल, शुद्ध आहे. ते चिद्रूप असल्याने, ते सदा बुद्ध म्हणजे बोधस्वरूप / ज्ञानस्वरूप आहे. या जगात नाना प्रकारची बंधने असतात. ब्रह्माला कसलेही व कशाचेही बंधन नसल्याने, ते सदासर्वकाळ मुक्त आहे. येथे शुद्ध, बुद्ध व मुक्त या प्रत्येक शब्दापूर्वी ' नित्य ' हा शब्द घेऊनही अर्थ करता येतो. तो असा होतो :- ब्रह्म हे नित्य शुद्ध आहे, नित्य बुद्ध आहे, आणि नित्य मुक्त आहे.

जो ब्रह्म जाणतो तो ब्रह्मच होतो (ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति) असे उपनिषदाचे / वेदाचे वचन आहे. त्यानुसार ब्रह्माला जाणणारा म्हणजे ब्रह्माचा साक्षात्कार करून घेणारा मुमुक्षु हा ब्रह्मरूप होऊन जातो, व नंतर ' मी ब्रह्म आहे ' अशी त्याची भूमिका होते.

मी ब्रह्म आहे हे ज्ञान संशय, असंभव आणि विपरीत भावना यांनी रहित असावयास हवे. म्हणजे असे :-' मी ब्रह्म आहे की नाही', ' ब्रह्मच आहे की नाही' अशा संशयात्मक, डळमळीत ज्ञानाचा काही उपयोग नाही.कारण भगवद्गीतेने म्हटल्याप्रमाणे, संशयात्म्याचा नाश होतो (संशयात्मा विनश्यति। ४. ४०). 'तसेच ब्रह्म कुठे, मी कुठे ? मी ब्रह्म कसा असेन ', अशा प्रकारच्या असंभवनीयतेचा विचार मनात येता कामा नये. मी ब्रह्म आहे ही खात्री पटावयास हवी. त्याचप्रमाणे 'मी ब्रह्म आहे' याच्या विरुद्ध असणाऱ्या भावनेचा स्पर्शही मनाला होता कामा नये.' मी शरीर आहे, मी इंद्रिय आहे', अशा प्रकारचा अध्यास संपूर्णपणे नष्ट झालेला असावयास हवा. अशाप्रकारे संशय ,असंभव व विपरीत भावना यांनी रहित असे 'मी ब्रह्म आहे' हे ज्ञान श्रवण, मनन, व निदिध्यासन यांचे द्वारा होते. (श्रवण, मनन व निदिध्यासन यांचे विवेचन मागे अनुक्रमाने खंड १८-२५, खंड २६ आणि खंड २७ मध्ये आलेले आहे).

मी ब्रह्म आहे असा साक्षात्कार झाला की मुमुक्षूच्या जीवनाचे सार्थक होते. तो कृतकृत्य होतो. विद्यमान जीवनात तो ब्रह्मरूप झाल्याने, तो जीवन्मुक्त [1] होतो. तो कर्माच्या कचाट्यातून मोकळा होतो, तो भावी जन्ममरणाच्या चक्रातून सुटून जातो, तो लौकिक सुख व दुःख यांचे अतीत होतो. आनंद हे स्वरूप असणारे ब्रह्म तोच झाला असल्यामुळे, त्याचे सर्व प्रकारचे दुःख दूर होऊन, तो आनंदरूप होऊन जातो.

॥ इति शम् ॥

*** **आत्मानात्मविवेक समाप्त** ***

---

१. प्रारब्ध कर्मांनि प्राप्त झालेला देह नष्ट होईपर्यंत तो जीवन्मुक्त विद्यमान रहातो. देह नष्ट होऊन जाताच तो विदेहमुक्त होतो.

## संदर्भ - सूची


| | |
|---|---|
| अद्वैतानुभूति | शंकराचार्य |
| अर्थसंग्रह | लौगाक्षि भास्कर |
| आत्मबोध | शंकराचार्य |
| तत्त्वोपदेश | शंकराचार्य |
| पंचदशी | विद्यारण्यस्वामी |
| ब्रह्मसूत्र | शांकरभाष्यसहित |
| भगवद्गीता | |
| मनुस्मृति | |
| वाक्यवृत्ति | शंकराचार्य |
| वाक्यसुधा | शंकराचार्य |
| विवेकचूडामणि | शंकराचार्य |
| वेदान्तसार | सदानंदयति |
| सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह | शंकराचार्य |
| स्वात्मनिरूपण | शंकराचार्य |

## नियतकालिकात प्रसिद्ध झालेले ग्रंथ

**१) शंकराचार्य :-** स्वात्मनिरूपण, स्वात्मप्रकाशिका , अमरोक्षानुभूति, अद्वैतानुभूति, वाक्यवृत्ति,वाक्यसुधा, इत्यादि ३२ ग्रंथ

**२) उपनिषदे** : -

आत्मोपनिषद् , कैवल्य उपनिषद्, इत्यादि १० उपनिषदे

**३) तात्त्विक** : -

रामानुजाकार्यकृत श्रीभाष्य १.१.१, मध्वाचार्यकृत खंडनत्रय, गौडपाद भाष्यासह सांख्यकारिका, भगवद्गीता :- मोक्षमार्गांचे विवेचन व एक अध्ययन, रामगीता, भारतीय तत्त्वज्ञानातील आत्मसाक्षात्काराचे मार्ग (इंग्रजीत), इत्यादि

**४) चिकित्सक** : - मूळ गीता व तिचा लेखक (इंग्रजीत), ज्ञानेश्वर अभंगावरील लेख, पंचदशीवरील लेख, कालिदासाच्या नाटकावरील लेख, रामरक्षा, इत्यादि.

## अप्रकाशित

१) विस्तृत अर्धमागधी व्याकरण

२) हेमचंद्रकृत प्राकृत व्याकरण (मराठीत)

३) ब्रह्मसूत्रातील बौद्ध व जैन मतांचे खंडन
(पी.एच.डी. साठीचा इंग्रजीतील प्रबंध)

श्रुतिस्मृतिपुराणानामालयं करुणालयम् ।
नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम् ।।